Regd. No. M H 1332

# नवभारत

या अंकात –




वर्ष २८

अंक सातवा

एप्रिल १९७५

रु. १-२५


अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष अठ्ठाविसावे अंक सातवा

# नवभारत

एप्रिल १९७५

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. वेडेकर— प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. मे. पुं. रेगे का. संपादक



**वार्षिक रु. १२** **अंकास रु. १·२५**

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. वेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता :—

१. संपादकीय :– कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
प्राध्यापकांचे निवासस्थान कीर्ति कॉलेज, दादर-मुंबई २८

२. व्यवस्थापकीय :– व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

# निवेदन

संतश्रेष्ठ श्री ज्ञानेश्वर यांची सप्त जन्मशताब्दी या वर्षी सर्वत्र साजरी होत आहे. त्यानिमित्ताने 'नवभारत'चा या वर्षीचा दिवाळी अंक--

## ज्ञानेश्वर विशेषांक

म्हणून काढावयाचे योजिले आहे. हा अंक संग्राह्य व संदर्भमूल्य असलेला व्हावा असा प्रयत्न आहे. या अंकासाठी मान्यवर विद्वानांचे सहकार्य लाभणार आहे. अंकाच्या प्रती मर्यादित असल्याने त्याची मागणी वाचकांनी शक्य तितक्या आधी करणे इष्ट ठरेल. वर्गणीदारांना हा अंक नेहमीच्या वर्गणीत मिळेल.

पुढील अंकापासून डॉ. सुरेश म. डोळके यांची 'श्रीचक्रधर विरचित (?) श्रीकृष्णचरित्र' ही लेखमाला सुरू होत आहे. यापूर्वी प्रसिद्ध झालेले 'श्रीकृष्ण चरित्र' अपुरे होते. डॉ. डोळके यांना मिळालेले 'श्रीकृष्ण चरित्र' संपूर्ण असून वैशिष्ट्यपूर्ण आहे.

---

अनुक्रमणिका

तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी

# भगवान श्रीकृष्ण

भगवान श्रीकृष्ण ही अतिप्राचीन भारतेतिहासातील कलाटणी देणारी एक वास्तविक व्यक्ती होऊन गेली विष्णूच्या प्रसिद्ध दशावतारातील मत्स्यापासून वामनापर्यंतचे पाच अवतार जसे काल्पनिक अवतार आहेत, तसा कृष्ण हा केवळ काल्पनिक अवतार नाही. रामही अशीच ऐतिहासिक व्यक्ती असणे फार शक्य आहे असे पुराणसंशोधकांचे मत आहे. हिंदुधर्माला मानवदेहधारी साक्षात परमेश्वरच या दोन ऐतिहासिक व्यक्तींच्या रूपातच विशेषतः मिळाला. विष्णू, शिव, देवी, दत्त, गणेश इत्यादी साक्षात परमेश्वरस्वरूप मानलेले देव या ऐतिहासिक व्यक्ती होत्या असे कोणीही मानत नाही. रामापेक्षाही कृष्णाला हिंदुधर्मांत अधिक महत्त्व आले, ते त्याने स्थापन केलेल्या भागवतधर्मामुळे किंवा भक्तिसंप्रदायामुळे होय. कृष्णाचाच भक्तिसंप्रदाय हा रामभक्तीतही परिणत झाला.

कृष्णचरित्रात अद्‌भुत अतएव काल्पनिक असे प्रसंग व असेच पराक्रम वर्णिलेले आहेत. हे अशा अद्‌भुत प्रसंगानी व पराक्रमांनी भरलेल्या या चरित्रातही वास्तविक ऐतिहासिक अंश किंवा बीजे सहज अनुमानिता येतात. वास्तवालाच कल्पनारम्य अद्‌भुत रूप दिलेले लक्षात येते. बाल्यावस्थेत कृष्णाने पूतना या राक्षसीचे स्तनपान करतानाच तिचे प्राणापहरण केले, या कथेचा ' पूतना ' नामक बालरोगातून त्याची त्वरित सुटका झाली असा अर्थ लागतो, उखळाला दोराने बांधलेल्या बालकृष्णाने दोन अर्जुनवृक्षांमध्ये अडकलेल्या उखळाच्या जोरावर ते दोन अर्जुनवृक्ष पाडले, ही कथाही बांधलेले उखळ त्याने फरफटत नेले आणि बागेतील लहान बालवृक्ष त्यामुळे मोडून पडले, या वस्तुस्थितीशी जुळू शकते, गाडा उलथून टाकणे; प्रचंड उन्मत्त बैलाशी झुंज घेऊन त्याची शिंगे मोडून त्याला ठार करणे; बेलगाम व बेफाम झालेल्या दांडग्या घोड्याला काबूत आणून व लोळवून ठार करणे इत्यादी पराक्रमही नवतरुण व मल्लविद्येत प्रवीण अशा बलिष्ठ कृष्णाला शक्य आहे; असंभवनीय नाही. शकटासुर, वृषभासुर, केशी दैत्य, मथुरेच्या दरवाजातील कुवलयापीड हत्ती

(विश्वकोशातील एक नोंद).

अनुक्रमणिका






इत्यादिकांच्या निर्दालनाच्या कृष्णाच्या नवयौवनातल्या घटना वास्तविक असू शकतात. त्यात अलौकिक बुद्धिमत्ता, शरीरसामर्थ्य, चपलता, प्रसंगावधान, धैर्य आणि कुशलता हे गुण कृष्णाच्या ठिकाणी एकत्रित झालेले दिसून येतात, चाणूरासारखे अप्रतिम मल्ल, मल्लयुद्धात खेळत खेळत ठार करण्याचीही शक्ती मल्लविद्येत प्रवीण असलेल्या व्यक्तीला असू शकते, कृष्णाच्या बाललीलांमध्ये त्याच्या नवयौवनातील कथांचा अंतर्भाव केला आणि त्या अधिक अद्‌भुत रसात्मक केल्या: ही गोष्ट कृष्णाला "दिव्यावतार" मानण्याच्या कालखंडात झालेले परिवर्तन होय. यशोदेला बालकृष्णाने आपल्या मुखात विश्वरूप दर्शन दिले, ही कथा अशा परिवर्तनानंतर प्रविष्ट झाली. गोवर्धन पर्वत करंगळीवर कृष्णाने पेलला; अशा तऱ्हेच्याही कथा त्याची दिव्यावतार म्हणून पूजा झाल्यानंतरची कथा होय. या कथेतही वास्तवाचे बीज स्पष्ट दिसते. इंद्रपूजा किंवा इंद्रध्वजोत्सव बाजूला सारून, गोप्रचार, भूमीच्या किंवा पर्वताच्या पूजनाचा कृष्णाने पुरस्कार केला ही गोष्ट कृष्णाच्या नवयौवनात घडणे शक्य आहे. वैदिक श्रेष्ठ देव असलेल्या इंद्राचे माहात्म्य कमी करून जुन्या धार्मिक परंपरांना महत्त्व देऊन त्या सुरू करण्याचा कृष्णाचा यत्न होताच वैदिकेतर व वेदपूर्व हिंदुधर्मातील परंपरांना उजाळा देणारा थोर धर्मसुधारक म्हणूनही कृष्णाचे महत्त्व या कथेने चांगले सूचित होते. वैदिक यज्ञ धर्माच्या परंपरेला दुय्यम लेखणारा व वासुदेवभक्तिसंप्रदाय उपनिषदाच्या तत्त्वज्ञानाचा आधार देऊन दृढ करणारा कृष्ण ही सर्वश्रेष्ठ ऐतिहासिक व्यक्ति होय, असे त्याच्या चरित्रातील अनेक कथांवरून सूचित होते. गोपालन व गोमातेची पूजा हा हिंदुधर्मातला एक केंद्रवर्ती आचारधर्म आहे. या आचार धर्माला कृष्णाने प्राधान्य दिले.

कृष्णाचा 'देवकीपुत्र कृष्ण' असा उल्लेख 'छांदोग्य उपनिषदा'त ( ३.७.६.) आला असून, घोर अंगिरस या ऋषीने, मनुष्यजीवनच यज्ञ म्हणून चालवावे; या यज्ञाच्या दक्षिणा तप, दान, ऋजुता, अहिंसा आणि सत्यवचन ह्या होत, असा उपदेश केल्यामुळे कृष्ण हा तृष्णामुक्त झाला, असे म्हटले आहे. 'भगवद्‌गीते'शी हा उपदेश जुळतो. वासुदेव कृष्णाचा अर्जुनाबरोबर उल्लेख पाणिनीने केलेला आहे. क्षत्रिय म्हणून या दोघांनाही पाणिनीकाली मान्यता नसावी.

मूळ 'महाभारत' ( इ. स. पू. सुमारे ३०० ), 'हरिवंश' ( इ. स. पू. सुमारे २ रे– ३ रे शतक ), 'विष्णुपुराणा'चा ( इ. स. सुमारे ५ वे शतक ) पाचवा अंश, 'भागवता'चा ( इ. स. सुमारे ९ वे शतक ) दशमस्कंध आणि अखेरीस 'ब्रह्मवैवर्त पुराण' ( इ. स. सुमारे १५ वे शतक ) हे कृष्णचरित्राचे

ऐतिहासिक क्रमाने मुख्य आधारग्रंथ होत. 'महाभारता'च्या सभापर्वामध्ये राजसूय यज्ञात अग्रपूजेचा मान कृष्णालाच का देणे जरूर आहे, याचे समर्थन भीष्माने केले. त्या समर्थनाच्या निमित्ताने जे कृष्णचरित्र भीष्माने सांगितले आहे, ते 'हरिवंशा'तूनच जवळजवळ सगळे उचलले आहे, असे भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंदिराने प्रसिद्ध केलेल्या 'हरिवंशा'च्या संशोधित आवृत्तीच्या प्रस्तावनेत डॉ. प. ल. वैद्य यानी सिद्ध करून दाखविले आहे. म्हणून असा निष्कर्ष निघतो, की कौरव-पांडवांच्या संदर्भात सांगितलेल्या कृष्णाच्या कथा ह्या 'महाभारता'तील मूळच्या असून, सभापर्वातील भीष्मोक्त कृष्णचरित्र ही 'हरिवंशा'तून घेतलेली भर आहे. 'विष्णुपुराणा'तील कृष्णकथा ही 'हरिवंशा'च्याच कथेत काही भर टाकून सांगितली आहे. आज भारतात सर्वत्र प्रसृत असलेली कृष्णकथा ही मुख्यत: 'भागवता'च्या दशमस्कंधातील कृष्णकथा होय. दशमस्कंध हा कृष्णकथेला वाहिलेला स्कंध आहे. 'हरिवंशा'तीलच कथांना अधिक अद्‌भुतरम्य रूप देऊन आणि वत्सक, अघासुर, प्रलंब आणि शंखचूड या असुरांच्या वधाचे प्रसंग ही त्यातील 'हरिवंशा'पेक्षा निराळी अशी भर आहे. कुब्जेवरील प्रेमाच्या कथेतही अधिक रंग, 'भागवताने' भरला आहे. 'ब्रह्मस्तुती' आणि 'वेदस्तुती' हीही अधिक भर घातलेली प्रकरणे होत. रुक्मिणीस्वयंवर कथेमध्ये सुद्धा रुक्मिणीने कृष्णाला पाठविलेले प्रेमपत्र 'हरिवंशा'त नाही, ते येथे आहे. 'हरिवंशा'त केवळ कृष्णाची कीर्ती व रुक्मिणीच्या सौंदर्याचे वर्णन कानावर आल्यामुळे, दोघांची प्रीती एकमेकांवर बसली, असे म्हटले आहे. 'भागवता'त गोपी आणि कृष्ण यांच्या शृंगाराचे उत्तान वर्णन आले आहे. तसेच कृष्ण व गोपींची रासक्रीडा खूप खुलवून सांगितली आहे. 'हरिवंशा'त हा शृंगार आणि क्रीडा सूचक रूपानेच तेवढी आली आहे. 'महाभारत', 'हरिवंश' व 'भागवत' यांमध्ये कृष्ण हा गोपींचा प्राणवल्लभ म्हणून निर्दिष्ट केलेला असला, तरी तेथे कोठेही राधेचा निर्देश नाही. हालाच्या 'गाथासप्तशतीत' (इ. स. सुमारे ५वे शतक) राधा व कृष्ण यांच्या प्रणयाचा उल्लेख आला आहे. राधा ही इतर गोपींप्रमाणेच परकीया आहे, असे एक मत धरून मध्ययुगीन काही काव्ये लिहिली आहेत, तर राधा व कृष्ण यांचा विवाह झाला, असे धरून काही काव्यांमध्ये वर्णन आहे. राधा 'ब्रह्मवैवर्तपुराण' व जयदेव कविरचित 'गीतगोविंदा'त कृष्णाची परमप्रिया म्हणून चमकते.

'ब्रह्मवैवर्ता'त विष्णूची आदिमायाशक्ती हीच राधा बनली. मूळ 'महाभारता'त जशी कालांतराने भर पडत गेली, तशी मूळ 'हरिवंशात'ही ती

पडत गेली व मूळ ग्रंथ दुप्पट अथवा तिप्पट झाले. वरील सर्व ग्रंथांमध्ये असलेल्या कृष्णचरित्रांपैकी 'भागवता'तील कृष्णचरित्र हे मध्ययुगीन देशी-भाषांमध्ये प्रामुख्याने प्रसृत झाले. कृष्णाच्या बाललीला व राधाकृष्ण प्रणय मराठी संतांच्याही कवितांचा विषय बनला.

कृष्णचरित्र :

यदुवंशाच्या वृष्णिकुलात कृष्णाचा जन्म झाला. वृष्णी हा यदुवंशातील भीम सात्वत याच्या चार पुत्रांपैकी एक पुत्र. भजमान, देवावृध, अंधक आणि वृष्णी या चार भावांमध्ये यादवांचे राज्य विभागले होते. अंधकाकडे मथुरा व तिच्या भोवतालचा परिसर होता. अंधकाचा पुत्र कुकुर. कुकुराच्या वंशातील आहुकाला देवक, उग्रसेन इत्यादी पुत्र झाले. देवकाला चार मुलगे व सात मुली झाल्या. त्यांपैकी देवकी ही कृष्णाची माता होय. उग्रसेनाला नऊ पुत्र व पाच मुली झाल्या. उग्रसेनाचा सगळ्यात ज्येष्ठ पुत्र कंस होय. कंसाने पिता उग्रसेन यास बंदिखान्यात टाकून मथुरेचे राज्य बळकावले. वसुदेव उग्रसेनाचा मंत्री होता. वृष्णी, अनमित्र. देवमीढुष, शूर आणि शूराचा वसुदेव अशा पिढ्या सांगितल्या आहेत. वसुदेवाची सख्खी बहीण 'पृथा' म्हणजे पहिल्या तीन पांडवांची माता कुंती होय. कुंती ही कुंतभोज राजाला दत्तक गेली होती. देवकाची कन्या देवकी ही वसुदेवाची पत्नी व कृष्णाची माता होय. वसुदेवाला देवकी, रोहिणी इत्यादी सात भार्या होत्या.

वसुदेवाच्या विवाहाच्या अखेरीस वसुदेव व देवकी यांची रथावरून मिरवणूक निघाली. या रथाचे सारथ्य कंसाने आपली चुलत बहीण जी देवकी तिच्यावरील प्रेमामुळे केले. या मिरवणुकीच्या प्रसंगी आकाशवाणी झाली, की 'कंसा तुझा शत्रु, तुझा वध करणारा, देवकीच्या पोटी जन्माला येणार आहे.' 'हरिवंशा'तील चरित्रात मात्र असे म्हटले आहे, की नारदमुनींनी कंसाचा आतिथ्यसत्कार स्वीकारल्यावर त्याला भविष्य सांगितले की 'देवकीचा आठवा गर्भ हा तुझा अंत करणारा होणार आहे. वसुदेव हा उग्रसेनाचा मित्र असलेला मंत्री. त्याच्या बद्दल कंसाच्या मनात अढी होतीच. जरासंधाचा कंस हा जावई. जरासंध हा सर्व भारतवर्षातला सर्वश्रेष्ठ सम्राट, राजाचा राजा होता. त्याच्या पाठिंब्यावर कंसाने उग्रसेनाला म्हणजे आपल्या पित्याला पदच्युत करून सिंहासन बळकावले होते. कंस एका मोठ्या सम्राटाच्या पाठिंब्यामुळे अत्यंत उद्धट बनून त्याने प्रजेकडून जबरदस्त करभार वसूल करण्याचा सपाटा लावला. कंस यादवकुलीन होता. यादवांची विशेषतः वृष्णी आणि अंधक

कुलांची राज्ये होती. स्वतः कंस गणांच्या संमतीने राजा न बनता आपल्या सासऱ्याच्या बळावर राजा बनला. त्यामुळे गणराज्याची पद्धत बिघडविल्यामुळे व जुलमी धोरण पतकरल्यामुळे कंसाविरुद्ध असंतोष माजला असावा व या असंतोषाचे प्रतिनिधी वसुदेवाचे दोन पुत्र बलराम व कृष्ण बनले, असा तर्क करण्यास बरीच जागा आहे. वसुदेव हासुद्धा या असंतोषाच्या मुळाशी असावा. अनेक यादव कुले ही कृषी व गोपालन या व्यवसायातील होती. पशुपालन व कृषिकर्म हे जोडधंदे, गंगायमुनेच्या दुआबात भरभराटीस आले होते. भारी करभारामुळे पशुपालन न करणाऱ्या गणांमध्ये असंतोष माजल्यामुळेच नंदगोप हा वसुदेवाचा मित्र, कंसाचा गोपालक असूनही वसुदेवाच्या पक्षाला येऊन मिळाला. मथुरेच्या तीरावर 'व्रज' म्हणजे गोकूळ होते. ही विपुल समृद्धी असलेली व्रजभूमी होती. नंदगोपाकडे वसुदेवाने आपली दुसरी पत्नी रोहिणी ही सुरक्षिततेकरिता पाठविली होती.

आकाशवाणी वा नारदाची भविष्यवाणी ऐकल्यावर कंस भडकला आणि तो देवकीचा वध करण्यास उद्युक्त झाला. वसुदेवाने त्याची समजूत घातली व स्त्रीवधापासून त्याला परावृत्त केले असे 'भागवतात' म्हटले आहे. 'हरिवंशात' ही मिरवणुकीतली आकाशवाणी सांगितली नाही. तेथे असे म्हटले आहे की, नारदाची भविष्यवाणी लक्षात ठेवून कंसाने वसुदेवाच्या घरावर गुप्त रक्षक ठेवले; त्यात स्त्रियाही होत्या. देवकीला संतती झाल्याबरोबर कंसाला संदेश येई व त्याप्रमाणे तो नवप्रसूत बालकांचा ताबडतोब वध करून निकाल लावी. अशी सहा बालके त्याने नष्ट केली. सातवा गर्भ उदरात आल्याबरोबर देवकीच्या गर्भाशयातून ओढून घेऊन योगनिद्रादेवीने तो रोहिणीच्या गर्भाशयात ठेवला. तोच बलराम म्हणून जन्मला. त्याचे जन्मनाव 'संकर्षण' होय. एकीकडून ओढून दुसरीकडे नेलेला म्हणजे 'संकर्षण' होय. आठवा गर्भ म्हणजे साक्षात विष्णूने मानवशरीर धारण केलेला कृष्ण होय. हा प्रसूतीकाली चतुर्भुज विष्णूच्या रूपाने देवकीपुढे प्रगट झाला; परंतु देवकीच्या प्रार्थनेने त्याने पुन्हा नवजात बालकाचे रूप धारण केले. हा श्रावण कृष्ण अष्टमीस मध्यरात्री, रोहिणी नक्षत्रावर किंवा अभिजित नक्षत्रावर जन्मला. यावेळी 'भागवता'त सांगितल्या-प्रमाणे वसुदेव व देवकी यांच्या पायांत लोखंडी बेड्या कंसाने अडकविल्या होत्या. त्या एकदम निखळून पाय मोकळे झाले. 'हरिवंशा'प्रमाणे बेड्या घातल्याच नव्हत्या. वसुदेवाने मध्यरात्रीच त्या बालकाला नंदगोपाच्या गोकुळात नेले. नंदगोपाची पत्नी यशोदा नुकतीच बाळंतीण झाली होती; तिला मुलगी झाली होती; ती मुलगी वसुदेवाने उचलली, बाळकृष्णाला तिच्या कुशीत झोप-

विले, आणि तिच्या कन्येला घेऊन परत सूर्योदयाच्या आत तो मथुरेत स्वगृही परतला. 'भागवता'मध्ये हा प्रसंग अधिक अद्भूतरम्य करून वर्णिला आहे. कृष्णजन्माच्या वेळी भर पावसाळा सुरू होता, यमुना दुथडी भरून वाहत होती, तिने दुभंगून वसुदेवाला वाट दिली; असे तेथे म्हटले आहे. सकाळी कंसाला देवकी प्रसूत झाल्याची वार्ता मिळाली. वसुदेवाने आणलेली यशोदाकन्या त्याच्या हाती लागली. त्याने तिला शिळेवर आपटण्याकरिता उचलले, तोच ती त्याच्या हातून निसटून तिने आकाशात आपले संपूर्ण शारदा देवीचे रूप प्रगट केले आणि कंसाला सांगितले की, 'तुझा शत्रू अन्यत्र वाढत आहे' ही योगनिद्रादेवी यशोदेच्या गर्भात आली, कंसाच्या हातून निसटली, – विष्णूच्या वरदानामुळे विंध्यवासिनी देवी बनली आणि सर्व मानवांना पूजनीय, विघ्न-नाशिनी व सर्वकामप्रदायिनी बनली; असे सर्व पुराणातल्या कृष्णचरित्रात सांगितले आहे. याचा अभिप्राय असा की, वसुदेव भक्तिसंप्रदायाने किंवा वैष्णव संप्रदायाने देवीपूजेचा धर्म मान्य केला.

नंद आणि यशोदा यांचा पुत्र म्हणून कृष्ण गोकुळात व नंतर गोकुळाची वस्ती उठल्यावर वृंदावनात वाढला. वृंदावनात आल्यावर यमुनेच्या डोहात नागगणांचा अधिपती कालीया नाग गरुडाच्या भीतीने दडून बसला होता. नागांच्या विषाने यमुनेचे पाणी दूषित झाले होते, म्हणून कृष्णाने डोहात उडी मारून कालीयनागाचे दमन केले. आणि त्याला त्याच्या परिवारासह लांबदूर वस्ती करण्याच्या अटीवर जिवंत सोडले. कुरुकुल व यदुकुल यांच्याशी नागकुलाचे वैर दीर्घकाल चालू होते. अर्जुनाकडून करविलेल्या खांडववनदाहात तक्षककुल नष्ट झाले, तक्षक तेवढा बचावला, अशी 'महाभारता'त कथा आहे. परीक्षित राजाचा नाश तक्षकाने केला म्हणून जनमेजयाने सर्पसत्र करून नाग-कुलाचा नाश केला, अशी कथा 'महाभारता'त सांगितली आहे. वृंदावनात असताना वार्षिक इंद्रमह, इंद्रयज्ञ किंवा इंद्रपूजा कृष्णाने बंद पाडून गोवर्धन-पूजा सुरू केली. इंद्राने प्रचंड अतिवृष्टी करून, गोपांचे जीवित धोक्यात आणले, तेव्हा कृष्णाने गोवर्धन पर्वत करंगळीने उचलून त्याच्याखाली गायी व गोपालांना रक्षण दिले. इंद्राने अखेरीस प्रसन्न होऊन स्वतःच्या इंद्रपदावर गोविंदाला अभिषेक केला, असे 'हरिवंशा'त म्हटले आहे. वैदिक धर्माचे कृष्णभक्तिसंप्र-दायात रूपांतर झाल्याची सूचक ही कथा आहे.

वृंदावनातील कृष्णाचे अनेक शौर्यप्रसंग कंसाच्या कानावर वारंवार पडू लागले. त्यामुळे त्याला नंदगोप व गोपालकुल यांचा मत्सर वाटू लागला.

अनुक्रमणिका

गोपालकुलाचा निःपात करण्याचा विचार तो करू लागला. ही गोष्ट नंदाच्या व कृष्णाच्या ध्यानात आली. कृष्णानेही सावधगिरी बाळगून आलेल्या प्रसंगांना शिताफीने तोंड देण्याचा निश्चय केला. कंसाने कृष्णाचा व बलरामाचा युक्तीने नाश करण्याचा उपाय शोधला. 'धनुर्मह' म्हणजे 'धनुष्योत्सव' योजला. त्यात उत्कृष्ट, टणक, केवळ मोठ्या ताकदीनेच वाकवून पेलता येणारे धनुष्य, शक्तीची परीक्षा करण्याकरिता, ठेवण्याचा विचार केला. शूरांच्या विविध प्रकारच्या स्पर्धा म्हणजे मल्लांच्या कुस्त्या व धनुष्याचे खेळ ठेवले. यदुकुलोत्पन्न अक्रुर ह्याला नंदगोपाकडे वृंदावनात कृष्ण-बल-रामाला निमंत्रण देण्याकरिता पाठविले. कृष्ण-बलरामांचा मथुरेत सत्कार-पूर्वक प्रवेश झाला. मथुरेत राजमार्गावर कृष्ण-बलरामांना पाहण्याकरिता नागरिकांच्या रांगा लागल्या. राजमार्गातून जाताना वाटेत कंसाचे शस्त्रागार लागले. त्यात हे दोघे वीर विविध शस्त्रांच्या दर्शनार्थ उत्सुकतेने शिरले. तेथे एक महान धनुष्य, वीरांची कसोटी करील असे, ठेवलेले त्यांनी पाहिले. ते कृष्णाने सहज उचलून वाकविले व मोडून फेकून दिले. मथुरेत वीरांच्या स्पर्धांकरिता रणांगण व प्रेक्षकांचे मंचक सजवून तयार ठेवले होते. त्या रणांगणाला विशाल प्रवेशद्वार होते. कंसाने प्रचंड कुवलयपीड नावाचा हत्ती रणांगणाच्या दरवाजाजवळ येताच उभा केला होता. सूचनेप्रमाणे कृष्ण व बलराम प्रवेशद्वाराजवळ येताच तो मत्तमातंग कृष्णबलरामावर चालून गेला. त्याची सोंड पकडून त्याच सोंडेच्या शिडीने कृष्ण त्या हत्तीच्या मस्तकावर चढला. त्याने त्या हत्तीचा लांब सुळा उपटून त्याच शस्त्राने त्याला रक्तबंबाळ करून जमिनीवर आडवा केला. सबंध रणांगण सागरासारखी गर्जना करून कृष्णाचा जयजयकार करीत हेलावू लागले. कंसाने आपल्या मल्लश्रेष्ठ चाणूराला कृष्णाचा समाचार घेण्याकरिता पुढे करून कृष्णाला आव्हान दिले. कृष्णाने एका तडाख्यातच चाणूराचे मर्दन करून त्याला यमसदनास पाठविले. त्याच्या पाठोपाठ बलरामाने मुष्टिक या मल्लाला चारीमुंडे चीत केले. अशा अनेक महामल्लांची वाट लावल्यानंतर कंसाची यादवकुलाचे आणि नंदगोपाच्या जमातीचे निर्दालन करण्याची प्रतिज्ञा आठवून, कृष्णाने कंसाच्या सिंहासनावर झेप घेऊन कंसाचा शिरच्छेद केला आणि कंसाचा पिता उग्रसेन यास राज्याभिषेक केला.

यादवांच्या ताब्यात मथुरा आली. कंसही यादवच होता; परंतु तो गणांच्या संमतिवाचून राज्य बळकावून बसला होता; म्हणून, कृष्णाने मथुरापुरी यादवाधीन केली, असे 'हरिवंशा'त म्हटले आहे. त्यानंतर वृंदावनाकडे

न जाताच राम व कृष्ण यांनी काशी-देशीय परंतु अवंतिपुरनिवासी गुरू सांदीपनींकडे धनुर्वेदाध्ययनार्थ गमन केले. स्वतःची वेदशाखा व गोत्र गुरूंना सांगितले; चौसष्ट दिवसात वेदांचे सांग अध्ययन केले; चतुष्पाद धनुर्वेद व अस्त्रविद्या शिकली. कृतकृत्य झालेल्या कृष्णाने सांदीपनीला गुरुदक्षिणा काय द्यावी म्हणून पृच्छा केली. गुरुने सांगितले, 'प्रभासक्षेत्रात तीर्थयात्रे-करिता गेलो असताना, समुद्रात महामत्स्याने माझ्या पुत्राला ओढून नेले; त्यास परत आणून दे. कृष्णाने समुद्रात प्रवेश केला; समुद्राने त्याला सांगितले की, 'पंचजन नामक दैत्याने त्या बाळाला गिळले आहे.' पंचजन दैत्याचा कृष्णाने वध केला; गिळलेला गुरुपुत्र जिवंत केला; तेथे त्याला उत्कृष्ट शंख मिळाला. त्याचेच नाव 'पांचजन्य' होय. गुरूला मृतपुत्र जिवंत करून अर्पण केला. आपल्या मथुरेतल्या पितृगृही राम व कृष्ण दोघेही परतले. मगधातील राजगृहनामक राजधानीचा अधिपती जरासंध याला आपल्या दोन कन्यांचा पती कंस कृष्णाने मारला ही वार्ता कळल्यावर, कृष्णाचे पारिपत्य करण्या-करिता तो मथुरेवर चाल करून गेला. त्यात मगधसम्राट जरासंध आणि कृष्णाचे वृष्णिकुल यांचे युद्ध झाले. बलरामाने गदायुद्धात जरासंधाला जेरीस आणले; परंतु त्याचा वध न करता शरण आणून सोडून दिले. बलरामाला वृंदावनात पाठविले. राम तेथील आनंदपूर्ण जीवनाचे दर्शन घेऊन मथुरेस परतला. मथुरा राजधानी सुरक्षित रीतीने, निर्भयपणे, शांततापूर्ण जीवन घालविण्यास समर्थ नाही, ही गोष्ट जरासंधाच्या आक्रमणावरून लक्षात आल्याने, कृष्णाने आपल्या यादववंशातील वृष्णिकुलाला सल्ला दिला की, ही अशी आक्रमणे सतत वाढत्या प्रमाणात चालू राहणार, म्हणून आपण पश्चिम सागराच्या किनाऱ्यावर सुरक्षित व शत्रूस दुर्गम असलेल्या प्रदेशाचा आश्रय करू या. द्वारकापुरीची रचना समुद्र चोहोबाजूस असलेल्या एका बेटावर केली. द्वारकेस वार्ता आली की, जरासंधाचा मित्र हा कालयवन मथुरेवर चाल करून येत आहे हे कळल्याबरोबर कृष्ण मथुरेस परतला. कालयवन त्याचा पाठलाग करू लागला. कृष्ण हा झुकांड्या देत त्याच्या हातून निसटला व एका पर्वताच्या गुहेत शिरला. कालयवनाने त्याचा पिच्छा पुरविला. त्या गुहेत मांधात्याचा पुत्र मुचुकुंदराजा देवासुर युद्धात महापराक्रम करून श्रांत होऊन दीर्घ निद्रेला वश होऊन पडला होता. या निद्रेत जो कोणी त्याला जागा करील त्याला तो क्रोधाग्नीत जाळून टाकील, असा त्याला दैवी वाणीने आशीर्वाद दिला होता. त्याला कालयवनाने कृष्ण समजून लाथ मारून जागे केले. कालयवन त्याच्या नेत्रातून निघालेल्या ज्वालेत दग्ध होऊन नष्ट झाला.

कृष्णाने द्वारकेत व भोवतालच्या प्रदेशात बलरामाच्या साहाय्याने गणराज्याची स्थापना केली. या गणराज्याचा उल्लेख 'महाभारता'तील शांतिपर्वात आहे. कृष्णाने विदर्भराजा हिरण्यलोमा किंवा भीष्मक या यादव-वंशीय राजाच्या रुक्मिणीनामक सुंदर कन्येशी राक्षसविवाहविधीने विवाह केला. भीष्मकाला 'दाक्षिणात्येश्वर' असे विशेषण 'हरिवंशात' लावले आहे. तेथे म्हटले आहे की, 'कुंडिन नामक नगरीत राहून याने अगस्त्याच्या दिशेवर आपली राजसत्ता चालविली राक्षसविवाहविधी हा क्षत्रियास विहित मानला आहे. राक्षसविवाहविधी म्हणजे कन्येला तिच्या माता–पित्यांच्या संमतीवाचून पळवून नेऊन विवाह करणे. कृष्णाशी रुक्मिणीचा विवाह होणे, हे तिचा पराक्रमी बंधू रुक्मी यास मान्य नव्हते. रुक्मीने कृष्णावर सैन्य नेऊन हल्ला केला. जरासंध व तत्पक्षीय सर्व राजे या युद्धात कृष्णाच्या विरुद्ध पक्षास येऊन मिळाले. बलरामाने या युद्धात मोठा पराक्रम करून रुक्मीपक्षास जेरीस आणले. रामासह कृष्ण रुक्मिणीला द्वारकेस घेऊन गेला व तेथेच शास्त्रोक्त पाणिग्रहणविधीने कृष्णाने रुक्मिणीला वरले. असंतुष्ट व क्रुद्ध रुक्मीचा वध अखेरीस बलरामानेच केला. त्यानंतर, प्राक्ज्योतिषराज्याचा अधिपती नरकासुर होता, त्याचा कृष्णाने निःपात केला. सत्यभामा जांबवती, कालिंदी, मित्रविंदा, सत्या, भद्रा व लक्ष्मणा यांच्याशी कृष्णाचे विवाह झाले. यांच्यापैकी काहींची नावे पुराणात आढळतात. त्याही पराक्रमाच्या योगानेच त्याने मिळविल्या. कृष्णाच्या या अष्टनायिका होत; नरकासुराचा वध केल्यानंतर पुढे, नरकासुराच्या बंदीतील सोळा हजार कन्यांना कृष्णाने बंधमुक्त केले व वरले. त्यानंतर कृष्णाने आपली विश्वसुंदरी सत्यभामा हिला घेऊन गरुडावर आरोहण केले आणि देवराज इंद्राच्या नंदनवनात तो गेला; तेथे देवराजेंद्राने त्याचा बहुमानपूर्वक सत्कार केला. नंदनवनातील पारिजातकनामक पुण्यगंध दिव्यवृक्ष कृष्णाच्या दृष्टीस पडला. तो उपटून सत्यभामेकरिता गरुडावर आरोहण करून द्वारकेस आणला. त्यानंतर कामदेवासारखा सुंदर असलेला कृष्णपुत्र प्रद्युम्न शंबरासुराने किंवा कालशंबराने पळवून नेला. त्याचा वध करून कृष्णाने तो परत मिळविला. त्यानंतर बाणासुराशी युद्ध झाले. बाण हा शिवभक्त होता. त्यामुळे शिवाशीही कृष्णाचे युद्ध झाले. बाण आणि शिव यांचा या युद्धात पराभव झाला. त्यानंतर बाणासुराची कन्या उषा हिच्याशी कृष्णाचा नातू अनिरुद्ध याचा विवाह झाला. ही 'हरिवंशा'तील कथा शिवभक्तीपेक्षा कृष्णभक्ती अधिक पुण्यप्रद आहे याची सूचक आहे.

पांडवांचा आणि कृष्णाचा मैत्रीचा संबंध कृष्णाची भगिनी सुभद्रा व अर्जुन यांच्या विवाहाने दृढ झाला, असे 'महाभारता'त सूचित केले आहे. मगधराज जरासंध व कृष्ण यांचे वैर कंसवधापासून सारखे पेटलेले होते. कृष्णाने भीमाच्या हस्ते युक्तीने जरासंधाचा वध करविला. धर्मराजाने वनवासापूर्वी राजसूय यज्ञ केला, त्यांत अग्रपूजेचा मान कृष्णाला भीष्माच्या सांगण्यावरून मिळाला. चेदी देशाचा राजा शिशुपाल याने या प्रसंगी कृष्णाची राज्यसभेत भरपूर निंदा केली; त्यामुळे शिशुपालाचा कृष्णाच्या हातून तेथेच वध झाला. पांडवांच्या पत्नीची म्हणजे द्रौपदीची भरसभेत वस्त्रहरणपूर्वक विटंबना झाली, त्यात कृष्णाने आपली मानलेली भगिनी हिला वस्त्रे पुरवून तिची लाज राखली. पांडवांच्या वनवाससमाप्तीनंतर कृष्णाने पांडवांचा शांतिदूत म्हणून, दुर्योधनास पांडवांचा राज्यात अर्धा वाटा आहे तो दिला पाहिजे, असे पटविण्याचा प्रयत्न केला. परंतु दुर्योधनाने पांडव अज्ञातवास गुप्तरीतीने पूर्ण करू शकले नाहीत, या मुद्यावर हट्ट धरून राज्याचा भाग देण्याचे नाकारले. पूर्ण अज्ञातवासाची अट पांडवांना पाळता आली की नाही हा वादाचा मुद्दा आहे. डॉ. एस्. एल्. कत्रे यांच्या मते ही अट पांडवांना पूर्ण करता आली नाही. भारतीय युद्धात कृष्णाने दुर्योधनाला आपली सेना दिली व अर्जुनाचे सारथ्य स्वत: केले. त्यावेळी अर्जुनाला तत्त्वज्ञानावर अधिष्ठित असा कर्तव्यपालनास उपयुक्त नीति-तत्त्वांचा उपदेश करून युद्धाला प्रोत्साहित केले. कृष्णाने या युद्धात पांडवांना अनेकवेळा कुटिल सल्लामसलत देऊन त्यांच्या विजयास भरपूर हात दिला.

कृष्णाने युधिष्ठिराला भारतीय युद्धानंतर हस्तिनापूरच्या सिंहासनावर राज्याभिषेक केला आणि उत्तरेच्या गर्भात असलेला अभिमन्यूचा गर्भ परिक्षित याचे संरक्षण केले. युधिष्ठिराने राज्यारोहणानंतर अश्वमेध यज्ञ केला त्यात कृष्णाची पुन्हा भेट झाली.

कृष्णाच्या अखेरच्या जीवनपर्वात यादवांमध्ये आपसात मारामाऱ्या होऊन यादवकुलाचा संहार झाला. कृष्णपुत्र सांब याने नारदादी ऋषींची थट्टा केली; त्यामुळे ऋषींनी यादवांना शाप दिला, हे निमित्त आहे. राम–कृष्णांना या सर्व गोष्टीचा अत्यंत वीट आला. बलरामाने देहाचे विसर्जन केले आणि कृष्णाने प्रभासक्षेत्राजवळील वनामध्ये योगसमाधी लावली. त्यात एका पारध्याचा बाण लागल्यावर त्याने देह सोडून दिला.

दाशरथी रामाने राक्षसांचा नि:पात केल्यावर अयोध्येत राज्य करण्यास प्रारंभ केला. तेव्हा द्वापर युगास प्रारंभ झाला. यानंतर पंचाल, पौरव, चेदी,

मगध, यादव आणि पूर्वेकडे आनव या क्षत्रिय वंशांची भरभराट झाली. रामाचा सूर्यवंश रामानंतर अस्ताकडे कलला. पांचालांचा अखेरचा प्रसिद्ध राजा द्रुपद होय. कौरव व पांडव हे पौरव कुलातील होत. चेदी व मगध कुलातील अखेरचे सम्राट शिशुपाल व जरासंध होत. यादवांचे महापुरुष बलराम व कृष्ण होत. आनववंशाच्या सिंहासनावरील अखेरचा सुप्रसिद्ध शूर राजा कर्ण हा होय. दाशरथी रामाच्या वंशातील अखेरचा पुरुष बृहद्बल; याला कर्णाने पराजित केले. बृहद्बल हा कुरुक्षेत्रावर झालेल्या भारतीय युद्धात अभिमन्यूच्या हातून मारला गेला.

यादवकुलाचा पशुसंगोपन मुख्य व्यवसाय; त्यांच्या काही शाखांमध्ये तो कृष्णापर्यंत चालू होता. त्यामुळे कृष्णकथा ही वैश्य व शूद्र या भारतीय समाजरचनेतील लोकांमध्ये अत्यंत प्रिय झाली. शूद्रादी खालच्या वर्णांना कृष्ण हा आपल्यातला वाटू लागला. त्यामुळे भक्तिमार्ग हा चांडालादिकापर्यंत म्हणजे हरिजनापर्यंत हरिप्राप्तीचा मार्ग ठरला. नृत्य व वाद्यकलेत निपुण असलेला हा मुरलीधर गोपगोपींसह रासक्रीडेत रममाण होतो; गोपालनात निपुण; पोहणे कुस्ती इत्यादी शारीरिक शक्तींच्या खेळामध्ये तरबेज; उत्कृष्ट मल्ल असा कृष्ण सामर्थ्यशाली सुसंस्कृत जीवनपद्धतीचा आदर्श ठरतो. जरासंध, बाण इत्यादिकांशी संग्रामात विजयी होणारा म्हणूनही शूरांना तो स्फूर्ती देणारा ठरतो. पांडवांचा मुत्सद्दी सल्लागार आणि भगवद्गीतेच्या तत्वज्ञानाचा महान द्रष्टा म्हणून कृष्णाचे स्थान भारतीय संस्कृतीत अढळ बनते. वेदकालापासून आजपर्यंत झालेल्या जगातील धार्मिक विभूतींमध्ये, धर्मसंस्थापकांमध्ये इतके वैचित्र्यपूर्ण सर्वांगीण व समृद्ध चरित्र जगाच्या वाङ्मयात सापडत नाही.

पौराणिक परंपरेप्रमाणे कृष्ण हा द्वापरयुगाच्या अखेरीस म्हणजे द्वापर आणि कली यांच्या संधीकाळात इ. स. पू. सुमारे ३००० वर्षांच्या पूर्वी झाला. पुराणातील ऐतिहासिक कालगणना निश्चित करणाऱ्या पार्जिटर, डॉ. पुसाळकर इत्यादी विद्वानांच्या मते इ. स. पू. सुमारे १४ वे शतक हा कृष्णाचा काल अनुमानित झालेला आहे. भारतीय युद्ध कित्येक आधुनिकांच्या मते इ. स. पू. १२०० च्या सुमारास झाले. भारतीय युद्धाच्या समयी कृष्णाचे वय १०० किंवा त्याहून थोडे अधिक होते असे काहींचे म्हणणे आहे.

मूर्तिकलेत व चित्रकलेत कृष्णचरित्रातील जन्मापासूनचे प्रसंग निर्माण केलेले सापडतात. इ. स. पहिल्या शतकापासून तो पाचव्या शतकाच्या

कालातील मूर्तिशिल्पे मथुरेच्या परिसरात सापडली आहेत. वसुदेव कृष्णाला सुपात घेऊन यमुना पार करतो; असे शिल्प पहिल्या शतकातले आहे. पाचव्या-सहाव्या शतकातल्या शिलापट्टावर 'गोवर्धनधारण' आणि 'कालियामर्दन' अंकित केले आहे. बंगालमधील पहाडपूर येथे धेनुकासुरवध, दोन अर्जुनवृक्ष उलथणे, चाणूरमुष्टिकांशी मल्लयुद्ध, राधाकृष्ण अशा मृत्तिकामूर्ति सापडल्या आहेत. जोधपूरजवळ 'गोवर्धनधारण', 'यशोदेचे दधिमंथन', 'नवनीतचौर्य' इत्यादी दृश्ये तोरणस्तंभावर कोरलेली, चौथ्या शतकातील उपलब्ध झाली आहेत. मध्य प्रदेशातील देवगढ येथे कृष्णजन्म, शकट उलथणे, कृष्ण व सुदामा इत्यादी दृश्ये कोरलेली सापडली आहेत. मध्य प्रदेशातील पठारी येथेही कृष्णजन्माचे शिल्प सापडले आहे. याशिवाय महाबलिपुरम्, खजुराहो, राजस्थान व गुजरात येथेही उत्खननात विविध कृष्णशिल्पे मिळाली आहेत. सहाव्या-सातव्या शतकातील 'विष्णुधर्मोत्तरपुराणा'त पूजेसाठी निर्माण करावयाच्या कृष्णमूर्तीचे रुक्मिणी व सत्यभामा यांच्यासह शिल्प कसे तयार करावे, याचे तंत्र सांगितले आहे. रांगता बालकृष्ण, उडपीला मुरलीधर, राधासहित कृष्ण किंवा सत्यभामासहित कृष्ण किंवा पार्थसारथी कृष्ण इत्यादी कृष्णमूर्ती हंपी कांची, महाबलीपुरम् इत्यादी ठिकाणी दक्षिणेत आढळतात. भारतीय चित्रकलेतही कृष्णलीला चित्रित केलेल्या आहेत. गुजराती, राजपूत, कांग्रा, ओरिसा, काशी इत्यादी शैलींमध्ये कृष्णलीला चित्रित केल्या आहेत. नंदलाल बोस, यामिनी रॉय इत्यादी आधुनिक चित्रकारांनीही कृष्णचरित्रे रंगविली आहेत.

संदर्भ —

1. Katre S. L., K. rsna and the Mahabharat War, The Allahabad Univerity Studies Journal.

2. Mujumdar, R. C. & Pusalkar, A. D. Ed. The Vedic Age, London, 1957.

३. पणशीकर वा. ल. संपा. श्रीमत् भागवत, निर्णयसागर, मुंबई, १९२९.

४. भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर, संपा. महाभारत, पुणे., १९३३-१९५९.

५. भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर, संपा. हरिवंश, पुणे, १९६९.

◆ ◆ ◆

प्रा. हरिहर चन्द्रशेखर थोंगे

# विवेकसिंधु – पुनर्मूल्यांकन

( विवेकसिंधूच्या मराठी पोथीचा काळ )

मराठी साहित्याचा इतिहास मुकुंदराजाच्या विवेकसिंधूने आरंभ होतो. मुकुंदराजाच्या कालखंडासंबंधीचे वाद सांप्रत संपल्यासारखे असून ' शके अकराशे दहा ' ही त्यांच्या कालासंबंधीची मर्यादा आता निश्चित झालेली आहे. मुकुंदराजांचा हा कालखंड निर्धारित झाल्यामुळे ज्ञानदेवांचे ग्रंथ आणि महानुभावी साहित्यसंपदा एक शतकांनी उत्तरकालीन ठरते. आणि मराठी वाङमयीन परंपरेवर शांकर वेदान्ताचा प्रभावही दर्शविता येतो. कारण आद्य काव्यग्रंथ विवेकसिंधु हे मुकुंदराजांचे शांकरोक्तीवरील प्रवचन आहे. विवेकसिंधूला आद्य ग्रंथ म्हणून मान्यता देण्यात मराठी साहित्याच्या इतिहासाच्या प्रवाहांना वेगळ्या दिशेने वाट दिली जाते आणि महाराष्ट्री प्राकृत साहित्यातून प्रगट होऊ शकणाऱ्या, मध्ययुगीन महाराष्ट्रातील धार्मिक आणि तात्त्विक विचारांच्या उत्क्रांतीचे दुवे हरविले जातात. ' अध्यात्म वेदान्तशास्त्र पंडितांच्या परिसरातून काढून सामान्य माणसाच्या परिसरात आणून सर्वांना साध्य करून देण्याचे कार्य, जे पुढे वारकरी पंथाने केले त्याचा आरंभ मुकुंदराजांनी विवेकसिंधुद्वारा केला ' किंवा ' विवेकसिंधूमध्ये प्रतिपादलेले तत्वज्ञान त्याच्या आद्यत्वाचे द्योतक आहे ' अशी विधाने ज्यावेळी प्रा. कृ. पां. कुलकर्णी सारखे समीक्षक करतात त्यावेळी विवेकसिंधूच्या पोथीने मराठी साहित्याच्या इतिहासाचे सूत्र बदलविलेले असते, हेच सिद्ध होते. विवेकसिंधूच्या पोथीत वास्तविक महाराष्ट्रातील पंधराव्या शकातील धार्मिक आणि तात्त्विक वातावरणाचे संस्कार उमटलेले आहेत. विवेकसिंधूची पोथी ' अंतर्गत प्रमाण ' विसंगतीने भरलेली आहे. या विसंगतीचा नीटस शोध संशोधकांनी घेतलेला नाही. आप्तवाक्यप्रामाण्याने आणि गृहीततत्त्वाच्या पातळीवर विवेकसिंधुविषयीचे संशोधन होत राहिले आहे.

## शके अकराशे दाहोत्तरु

' शके अकराशे दाहोत्तरु ' या ओवीने विवेकसिंधूची प्राचीनतम कालमर्यादा निश्चित केलेली आहे. ' शके अकराशे दाहोत्तरु । साधारण नाम








संवत्सरु । राजा सारंगधरु । राज्यकरी ।। ऐसा समय सर्वोत्तमु । तेथे मुकुंद द्विजोत्तमु । विवेकसिंधु मनोरमु । निर्मिता झाला ।। ' या ओवीवरून ही काल-मर्यादा ठरविली गेली आहे. या ओवीसंबंधी काही काळापूर्वी संशोधकांनी संशय व्यक्त करून तिला प्रक्षिप्त ठरविले होते. कारण ही ओवी विवेकसिंधूच्या उपलब्ध प्रतीत फारच थोडक्या प्रतीत आढळते. आणि मूळ पोथीचा अंश म्हणून ती कोणत्याच पोथीत आढळत नाही. प्रा. कृ. पां. कुळकर्णी ह्यांना ९२ पोथ्यांपैकी ती फक्त दोनच पोथ्यात आढळली आणि त्यापैकी शके १६७८ च्या पोथीत ती समासात लिहिलेली आढळली. पण शके १७९९ मधील राजवाडे संग्रहातील पोथीत ती विवेकसिंधूच्या पोथीचा एक औरस अंश म्हणून अंतर्भूत झालेली आहे.[१] याचाच अर्थ असा की शके १६७८ ते शके १७९९ या काळाच्या दरम्यान ज्या पोथ्या निर्माण झाल्या त्यापैकी एखाद्या पोथीत ही ओवी असावी आणि शके १६७८ मधील पोथीवर एखाद्या लेखकाने ती मागाहून समासात उतरवून घेतली आहे. 'शके अकराशे दहा' ही कालनाममुद्रेची ओवी प्रक्षिप्त आहे असे संशोधकांनी जे मत व्यक्त केले होते, त्यांचा मुख्य आक्षेप या शकात साधारण संवत्सर येत नाही याच मुद्यावर केंद्रित झाला होता. आणि कै. बोबडे, तसेच प्रा० डोळके ह्यांनी निरनिराळ्या पद्धतीने शकसंवत्सराचा मेळ जमवून १११० शकात साधारण संवत्सर येते हे सिद्ध करून दाखविले आणि या ओवी विषयीचा संशय मागे घेण्यात आला.

## बोबडे संपादित विवेकसिंधूची पोथी

शके अकराशे दहा ही ओवी अंतर्भूत असणारी पाने कै. बाबाजी बोबडे ह्यांना प्राप्त झाली. या पानांची फोटोप्रतिमा त्यांनी आपल्या पुस्तकात छापली आहे ( पान ३० नंतर ). या पानांवरून त्यांनी शके १११० हे विवेकसिंधूच्या निर्मितीचे सूत्र झपाटल्यासारखे समोर मांडले. प्रा. डोळके ह्यांनी या सूत्राला संशोधनाचा आधार दिला. आणि विवेकसिंधूचे संशोधन करणाऱ्या अग्रगण्य संशोधकांनी या संशोधनाला मान्यता दिली.

कै. बाबाजी बोबडे संपादित विवेकसिंधूची पोथी आणि तिच्यावरील कालदर्शक ओवी यांत विसंगती आहे. 'तो कागद किती जुना आहे ह्याची छाननी, झाली पाहिजे' असे डोळके म्हणतात.[२] या पोथीभोवती बोबडे महोदयांनी गूढरम्य वातावरण निर्माण करून ठेवले आहे. मुख्यत: ज्या पानांवर ही

१. प्रा० कृ. पां. कुलकर्णी, विवेकसिंधु पान ७१

२. विवेकसिंधु – संपादन. बोबडे – प्रस्तावना. पान. २-३.

ओवी आढळली ती पाने कोणत्या कालखंडात लिहिलेली आहेत याचा शोध लागत नाही तोपर्यंत या ओवीला आणि त्या पानांच्या प्राचीनतेला अर्थ उरत नाही. म्हणून विवेकसिंधूच्या या प्राचीनतम ठरलेल्या पोथीचे पुनर्मूल्यांकन होणे आवश्यक आहे.

यादवकालीन भाषेची रूपे यावरून या पोथीचे आद्यत्व ठरविण्यात येते. विवेकसिंधूतील ओवीच्या रचनेवरूनही तिची प्राचीनता ठरविली जाते.* विवेकसिंधूच्या अनेक प्रतीतील संहितेचा पोत एकनाथकालीन आहे, हे दृष्टोस आल्यामुळे प्रा. कृ. पां. कुलकर्णी ह्यांनी पुनर्लेखनाचा मुद्दा उपस्थित केला. ‘ नकला करण्याच्या गदारोळात निरनिराळ्या काळखंडातील भाषेचा ठसा उमटून विवेकसिंधूच्या भाषेचे अर्वाचिनीकरण झाले असे मत प्रो० कुलकर्णी ह्यांनी प्रगट केले आहे.[३] पण याच विचारमार्गाने ज्ञानदेवी ग्रंथाचा शोध घेतला तर निरनिराळ्या काळी आणि अनेक स्थळी विभिन्न हस्ते ज्ञानदेवीचे सतत पुनर्लेखन झाले असूनही ज्ञानदेवीचा पोत विवेकसिंधूपेक्षा आर्ष का राहिला याचे समाधानकारक उत्तर सापडत नाही. पोथीच्या नकला होत असता भाषेची रूपे अशुद्ध होतात वा शुद्ध होतात, पण संहितेचा ध्वनी मात्र कायम ठेवण्याचाच प्रयत्न होत असतो. विवेकसिंधूची एकूण अभिव्यक्ती ज्ञानदेवकालीन नसून ती एकनाथकालीन आहे. या पोथीला १४ व्या शकापासून तो १७ व्या शकापर्यंत कोणत्याही कालखंडात ठेवता येते.

यादवकालीन भाषेची रूपे महानुभवी साहित्यात आणि एकनाथी भागवतातही रेंगाळतात. प्रा० कृ. पां. कुलकर्णी संपादित विवेकसिंधूतील मराठी रूपे यादवकालीन नसून अशुद्ध मराठीची वाटतात. ती रूपे प्राचीनत्वाची साक्ष देत नसून श्रवण वा लेखन दोषातून निर्माण होणाऱ्या अशुद्ध लेखनाचीही साक्ष देतात. विवेकसिंधूतील ओवीची रचना ही कालनिर्देशनाचे गमक ठरू शकत नाही. कारण पूर्वार्धातील प्रथम दोन अध्यायातील ओवीचा पोत ज्ञानदेवीप्रमाणे आहे. उत्तरार्धात तिचे गुरुचरित्रातील ओवीशी साम्य दिसते आणि अधून मधून एकनाथी भागवतासमान ओवीची रचनाही वेचून घेता येते. उदा.

‘ जो अविद्याकामकर्मे वेष्टितु । अज्ञानवशे स्वस्वरूपी भुलतु ।
तो जीव सुखदुःखी व्याकुळितु । तो ईश्वरु कैसेनि गा ॥ ’

किंवा

* प्रा. कृ. पां. कुलकर्णी – पूर्वोक्त ग्रंथ पान ८०.

३. प्रा० कृ. पां. कुलकर्णी प्रस्तावना पान ७६.

'काष्टि असता दाहकु । दृश्या काष्टा जेवी प्रकाशकु ।
काष्ट व्याप तो व्यापकु । म्हणौनि विलक्षणु जाणावा ॥

– या ओव्या एकनाथी भागवताच्या वळणाच्या आहेत. ओवीच्या रचनेवरून विवेकसिंधूचे आद्यत्व ठरविता येत नाही.

यादवकालीन भाषेची रेंगाळणारी रूपे, कांही पोथ्यात आढळतात. विशेषतः कृ. पां. कुलकर्णी संपादित विवेकसिंधूत अपभ्रंशाची प्रथमाविभक्तीतील रूपे आढळतात. पण त्यांना गवसलेल्या हस्तलिखित पोथीचा प्राचीनतम काळ शके १५७५ चा आहे. बोबडे संपादित विवेकसिंधूतील रूपे ही 'आठल्ये संपादित' मुद्रित विवेकसिंधूच्या रूपांशी तंतोतंत जुळतात एवढेच नव्हे तर बोबडे संपादित विवेकसिंधूतील हस्तलिखिताची जी फोटोप्रत आहे तीमधील शब्दांची रूपे अधिक शुद्ध आणि अलिकडची आहेत.

## शके अकराशे दहाची ओवी

पुरातत्त्वीय निकषावर 'बोबडे प्रतीचे' मूल्यमापन करण्याचे आधी 'शके अकराशे दहाच्या' ओवीचा विचार करून तिची नीट संगती लावणे आवश्यक आहे. संशोधकांनी हे कार्य केलेले नाही. बोबडे प्रतीतील ओव्या अशा आहेत : 'या ग्रंथाचे उत्तरार्ध । जे निर्गुण निरुपम प्रसिद्ध । म्हणे राजयोगी सिद्ध । मुकुंदराज ॥ लिहिणार सुरेंद्र भारती । संवत १२४४ प्रती । विजया दशमी मुहूर्ती । सूर्य माध्यान्ही येता । वैन्यगंगेचे तीर । अंबनगरी असे थोर । श्री गुरु समोर । ग्रंथ समाप्त जाहला ॥ आता शक महाराष्ट्राचा । शालिवाहन राजा पैठणीचा । नामोच्चारण तयाचा । जाणती सर्व लोक ॥ शके अकराशे दाहोत्तरु । साधारण नाम संवत्सरु । राजा सारंगधरु । राज्य करी ॥ ऐसा समय सर्वोत्तम । तेथे मुकुंद द्विजोत्तम । विवेकसिंधु मनोरम । निर्मिता झाला । या ग्रंथाचा उतार । शके ११२२ सोत्तर । दुंदुभी नाम संवत्सर । ते दिवशी जाहला ॥ हस्ताक्षर जयाचे । कृष्णभट्ट नाम तयाचे । रामभट्ट नाम पितयाचे । उपनाम पंडित ॥ वस्ती तापी तीर । ग्रामनामे वन्नर । हा ग्रंथ सविस्तर । उतार करणे जाहला । या ओव्या अंतर्भूत असणारी शक आणि संवत् यांचा एकत्र निर्देश असणारी व पोथीचा उतार शके ११२२ मध्ये झाला अशी नोंद ठेवणारी ही एकमेव प्रत होय. कृष्णभट्ट रामभट्ट पंडित या पोथीचा लेखक आहे. या ओव्यांचा सखोल अभ्यास होणे आवश्यक आहे. विवेकसिंधूसंबंधीची उपलब्ध वाङ्मयीन प्रमाणे तपासूनच कृष्णभट्ट पंडिताने या ओव्यांची रचना केली आहे हे स्पष्ट आहे. ही प्रमाणे कोणती ?

सुरेंद्र भारती मुख्य। हरीने प्रबोधिले कीर शिष्य। परी कृपा असंख्य। फळली रामचंद्री ॥ अशा आशयाची ओवी विवेकसिंधूच्या अठरा अध्यायी पोथीत सर्व उपलब्ध प्रतीतून आढळते. या ओवीचा मागोवा घेत कृष्णभट्टाने 'लिहणार सुरेंद्र भारती' अशी माहिती दिली असावी. कृष्णभट्टाने ११२२ शकांत पोथीचा उतार केला अशी नोंद आहे तो उतार करून घेण्यासाठी कृष्णभट्टासमोर एखादी पोथी असावी हे स्पष्ट आहे.

कृष्णभट्ट पंडिताने रचलेल्या ओव्या काळजीपूर्वक तपासल्या तर त्यातील संमत १२४४ असे जे वाचन केले जाते ते हेतुगर्भित आहे कारण हस्तलिखित पानांची जी फोटोप्रत बोबडे प्रतीत दिलेली आहे. त्यांत संमत १२४४ हा कालनिर्देश स्पष्ट नाही. हा अंक कापलेला आहे. या अंकाचे वाचन १८४४ अथवा १७४४ असेही होऊ शकते. फोटोप्रतीतील संमत हा शब्दही अस्पष्ट असून तो संवत् असाही वाचता येतो. कृष्णभट्टाने उतरवून घेतलेल्या व संमत १२४४ या कालाचा निर्देश असणाऱ्या ओव्यांत संवत्सराचीही नोंद नाही. त्यामुळे ज्यांनी या पोथीतून संमत १२४४ असे वाचन केले असते त्यांच्या मनात शके १११० चा कालखंड अकारण रेंगाळत असतो.

आमच्या मते ही पोथी 'संमत १२४४' ची नसून संवत १८४४ च्या प्रतीवरून तयार केलेली असावी. म्हणजेच ती (१८४४–१३४) १७१० शका-तील पोथीच्या आधारावरून तयार केलेली आहे. या एकदोन पोथ्यांतच सारंग-धराचा नामनिर्देश असतो. सारंगधराचा निर्देश मेघचंद्राच्या यक्षदेव वृद्धान्वयांत सापडतो. कृष्णभट्ट रामभट्ट पंडिताला मेघचंद्राच्या वृद्धान्वयाचा अभ्यास होता असे दिसते. तात्पर्य मेघचंद्रकृत वृद्धान्वयातील माहिती लक्षात घेऊन कृष्णभट्ट रामभट्ट पंडित या महानुभवी साधकाने बोबडे यांना सापडलेली हस्तलिखित पाने लिहिली आहेत असे स्पष्ट आहे.

## शके १११० नव्हे शके १७१०

१८४४ संवताच्या ऐवजी संवत १२४४ असे वाचन करण्याचा जो प्रमाद बोबडे यांचेकडून घडून आला तसाच प्रमाद शके १७१० चे ऐवजी शके १११० असे वाचन करण्यात केव्हातरी घडून आला आहे. असे प्रमाद घडून आल्याची काही उदाहरणे देता येतील. शके १११० असा कालखंड दर्शविणाऱ्या पोथ्यांच्या एक स्वतंत्र गट असून त्या पोथ्यात म्हणावे तसे पाठभेदही ध्यानात घेण्यासारखे नाहीत हे जर लक्षात घेतले तर शके १११० ची ओवी अंतर्भूत असणाऱ्या या फारच थोड्या पोथ्या एका मूळ पोथीच्या नकलेतून जन्मास आलेल्या आहेत हे

उघड आहे. 'शके अकराशे दहा' या ओवीची रचना सर्वत्र सारखी नाही. आशय कायम ठेवून ओवीतील शब्द मागेपुढे झालेले असतात. काही प्रतीत हा कालनिर्देश अंकान्वित असतो, काहीत तो अक्षरान्वित असतो. या ओवीची रचना अशा वेगवेगळ्या प्रकाराने का झाली असावी? त्याची कारणे शोधता येतात.

प्रतीची नक्कल होत असता कोणीतरी मूळ प्रत वाचतो आणि काही लेखनिक ती नकलून घेतात. या पद्धतीमुळेच अनेकदा पाठभेद तयार होतात. प्रत तयार होत असता वाचकाचा उच्चार, आणि लेखनिकांचे श्रवण वा आकलन किंवा वाचकाची दृष्टी यातील दोषामुळे वा अनवधानातून तयार होणाऱ्या प्रतीत निरनिराळे प्रमाद होतात. 'सिद्धनाथ ज्ञानदेवीची प्रत' लेखनप्रमादाचे उदाहरण म्हणून देता येते. या प्रतीत ७ या अंकाची वेलांटी अस्पष्ट उमटल्यामुळे ७ चा अंक १ असा दिसतो.[४] हस्तलिखितात ७ या अंकाच्या लेखनाची पद्धती लक्षात घ्यावी लागते. असाच प्रमाद प्रा. वि. वा. कुलकर्णी ह्यांनीही केलेला आहे. भा. इ. सं. मंडळातील विवेकसिंधूतील प्रत मन्मथ संवत्सरातील आहे. त्या अनुरोधाने ती १५७७ ची असता प्रा० कुलकर्णी यानी शके १५११ ची आहे.[५] ती मुद्रण चूक असावी असे वाटत नाही. शके १५११ मध्ये विरोधी संवत्सर येते आणि शके १५७७ मध्ये मन्मथ संवत्सर येते. तात्पर्य हस्तलिखित प्रतीत ७ आणि १ या दोन अंकांची गल्लत होणे शक्य आहे. म्हणूनच 'सतराशेदहा' या कालखंडाचे अस्पष्टतेमुळे 'अकराशेदहा' अशी चूक होणे स्वाभाविक आहे. कित्येकदा स चा उच्चार वा लेखन अ सारखे भासतात. अशा काही प्रमादाची शक्यता लक्षात घेऊनच शके १११० हा जो कालखंड विवेकसिंधूच्या फारच थोड्या प्रतीत उमटला आहे तो कालखंड शके १७१० मधील विवेकसिंधूच्या पोथीतील ७ या अंकाची वेलांटी अस्पष्ट झाल्यामुळे अथवा सतराशेदहा ही अक्षरे अस्पष्ट झाल्यामुळे, किंवा सतराशेदहा या अंकाचे वाचन करणाऱ्याच्या उच्चारदोषामुळे शके १७१० चे ऐवजी १११० असा चूक उमटला आहे. याच पोथीच्या चार पाच नकला अलिकडच्या काळात प्रसारात आलेल्या आहेत. शके १११० ची पोथी निकालात काढली की विवेकसिंधूच्या पोथ्या पंधराव्या शतकाच्या पूर्वीच्या कालखंडात अस्तित्वात होत्या याविषयी सध्यातरी कोणतीच प्रमाणे ज्ञात नाहीत.

बोबडे संपादित पोथी यादवकालीन नाही यासंबंधी अन्यकारणे देता येतात. (१) पोथीची अक्षर वाटिका विशेषतः अ या अक्षराचे लेखन यादव

४. रा. ग. हर्षे ज्ञानदेवी संशोधनसाहित्य – पान २६.

५. विदर्भ सं. मंडळ वार्षिक १९७१ पान १७८.

कालीन नाही. (२) शब्दांत अंतर पाडून लिहिण्याची पद्धती हस्तलिखितात अलिकडची आहे. बोबडेप्रतीत शब्दांवरील शीर्षरेखा सलग नसून, शब्दांतील अंतर स्पष्ट करण्यासाठी तोडलेली आहे. (३) यादवकालीन ताम्रपट, अभिलेख, आणि मराठी साहित्य यावर कुठेही शक आणि संवताची एकत्र नोंद नाही. अशी एकत्र नोंद एकनाथोत्तर काळात मात्र आढळते.[६] बाबाजी बोबडे यांना मिळालेली पोथीची पाने अतिशय जीर्ण होती असे ते सांगतात पण पोथीची ही पाने आणि ही कालदर्शक ओवी दर्शविणारी पाने फोटोप्रतीवरून मात्र जीर्ण वाटत नाहीत त्याअर्थी या पोथीच्या पानांचा उतार अगदी अलिकडच्या काळखंडात झालेला आहे. आणि उधईने खाऊन टाकलेल्या मूळ पोथीतील कालनिर्देशक अंक अस्पष्ट झाल्यामुळे संवत १२४४ आणि शके १११० असे ते वाचन करण्यात आले. पण ते वाचन संवत १८४४ आणि शके १७१० असे व्हावयास पाहिजे.

शक संवत्सराचा मेळ

बार्हस्पत्यरीतीने शके १११० मध्ये साधारण संवत्सर येत नाही. शके १११० च्या पोथीच्या औरसपणाविषयी संशोधकांचा एवढाच आक्षेप होता पण डॉ. डोळके ह्यांनी वराहमिहिराच्या पद्धतीने शके १११० मध्ये साधारण संवत्सर येते हे सिद्ध करून दाखविले. पण संवत्सर ठरविण्याची वराहमिहिराची पद्धती सदासर्वदा अवलंबिली जात नसावी असेही वाटते. कारण याच रीतीने शके १७१० मध्ये कालयुक्त संवत्सर येते आणि शके १७१० च्या पोथीत मात्र किलक संवत्सराचा निर्देश आहे.[७] तसेच शके १७१८ चे पोथीवर नल संवत्सर आहे आणि १७१९ शकातील पोथीत पिंगळ संवत्सर आहे. पण वराहमिहिराच्या रीतीने ही संवत्सरे मिळत नसून ती बार्हस्पत्यरीतीने मिळतात. बाबाजी बोबडे ह्यांनी ज्या पद्धतीने शके १११० मध्ये साधारण संवत्सर शोधून दाखविलेले आहे त्या सोप्या पद्धतीने साधारण (१७१०+१३४÷६०) शके १७१० मध्येही साधारण संवत्सर येते आणि शके १७२२ मध्ये याचपद्धतीने दुंदुभी संवत्सर येते.

बोबडेप्रतीविषयी आता असा संक्षेप निघतो : (१) अक्षर वाटिका आणि लेखनशैली यावरून ही पोथी १६ व्या शतकानंतरची आहे. (२) पोथीतील कालनिर्देशक १७१० हा अंक अस्पष्ट असल्यामुळे अथवा त्या अंकावरील शाई पुसट झाल्यामुळे तो अंक १११० असा वाचला गेला. (३) या पोथीवर १८४४ संवताची नोंद असावी. (४) पोथीचा उतार १७२२ शके असावा. (५) या

६. ज्ञानदेवी रा. ग. हर्षे, औंधप्रत ( शके १७७१ ) पान. १२.

७. कृ. पां. कुलकर्णी, पूर्वोक्त ग्रंथ – ज्ञ. प्रत. पान. ९.

पोथीवर संवत्सराची नोंद नसावी. (६) या पोथीचा उतार करणाऱ्याने त्याला अवगत असणाऱ्या पद्धतीने संवत्सर शोधून काढले व अशा रीतीने शकसंवत्सराचा मेळ घालून पोथीतील ओवीची रचना केली. शके १७१० मधील या पोथीत यक्षदेववृद्धान्वयातील सारंगधराचा आणि मुकुंदराज जयंतपाळाचा इतिहास ध्यानात घेऊन शारंगधराचे नाव गोवण्यात आले. शके १७१० ची पोथी कृष्णभट्ट पंडिताला गवसली. ती त्याने उतरवून घेतली आणि तीच बोवडेनाही प्राप्त झाली. अशा रीतीने बाबाजी यांना गवसलेली प्रत भाषा, लेखनशैली, यांच्या निकषावर शके १७१० मधील ठरते. विवेकसिंधूत ज्या व्यक्तींचा निर्देश आहे त्यांचा कालखंड एकनाथोत्तर काळातच निश्चित होऊ शकतो.

मुकुंदराज हा मराठीभाषेतील आद्य कवी असूनही नामदेवांच्या गाथेत अथवा नामदेव ते तुकाराम यांच्या काळखंडातील झालेल्या संतांच्या अभंगांत त्यांचा निर्देश कुठेही नाही. एकनाथी भागवतातही त्यांना नमन केलेले नाही. त्याअर्थी एकनाथांच्या कालखंडातही मुकुंदराजांचे नावामागे वा त्यांच्या कलाकृतीमागे दिव्यतेचे वलय नसावे.

## विवेकसिंधूतील अंतर्गत विसंगती

विवेकसिंधूच्या पोथीत जी अंतर्गत विसंगती आहे तिचा जर नीट शोध घेतला तर या पोथीविषयी नवा विचार होणे आवश्यक आहे.

पूर्वार्ध आणि उत्तरार्ध अशी या पोथीची प्रकरणे आहेत. पूर्वार्धाचे सात अध्याय आणि उत्तरार्धाचे अकरा अध्याय अशी एकूण अठरा अध्यायी पोथी सर्वमान्य आहे. पण उत्तरार्ध आणि पूर्वार्ध यांच्या वेगळ्या पोथ्याही उपलब्ध आहेत. राजवाडे संशो० मंदिरातील विवेकसिंधूची पोथी केवळ उत्तरार्धाची असून ती पोथी फक्त सात अध्यायाची आहे. काही विवेकसिंधूचे प्रतीत ( सार्थ विवेकसिंधु आठले प्रत ) उत्तरार्ध प्रथम अध्यायापासून प्रारंभित होतो. तसाच बोबडेप्रतीतही आरंभ होतो. बोबडेप्रत आणि आठलेप्रत एकाच प्रतीच्या दोन नकला आहेत असे आढळते. विवेकसिंधूच्या केवळ पूर्वार्धाच्याही पोथ्या अस्तित्वात असाव्यात ( ऋद्धीपूर प्रत शके १५७२ ) पूर्वार्ध आणि उत्तरार्ध यांच्या स्वतंत्र पोथ्या उपलब्ध असाव्यात अथवा विवेकसिंधुकारांनी पूर्वार्ध वेगळा आणि उत्तरार्ध वेगळा लिहिला अशी माहिती विवेकसिंधूच्या पोथीतूनही प्राप्त होते.

पूर्वार्धात– नृसिंह बाळु आणि त्याचा कुमर जयंतपाळ यांची नावे आहेत. या नावांचा उत्तरार्धात परिचय होत नाही. पूर्वार्धाच्या पोथीचे कर्तृत्व नृसिंह

बाळूचे आहे. जयंतपाळाने नरसिंहाकडून ह्या ग्रंथाचे मराठी भाषांतर करवून घेतले आहे. मुकुंदराजांच्या ग्रंथाचे मराठीत भाषांतर करणाऱ्या नरसिंहाला श्वासाचा त्रास आहे. या ग्रंथाचा प्रपंच करण्याचे कार्य त्याच्या शक्तीबाहेर होते. तरीपण आपल्या हातून ग्रंथ पूर्ण झाला ह्याचे त्याला समाधान आहे. ‘मज स्वासोश्वासाचा श्रमु। तेथ कासेया ग्रंथाचा उद्यम। परि फळला मनोधर्म। सदैवाचा ॥ (पूर्वार्ध–७–१५४) या ओवीतून ते स्पष्ट आहे. कारण पुढे तो म्हणतो, ‘नृसिंहाचा बल्लाळ। तयाचा कुमर जयंतपाळ। तेणे करविला हा रोळु। ग्रंथरचनेचा ॥’. श्वासोश्वासाचा त्रास मुकुंदराजांना नसून नृसिंहाला आहे. कारण मुकुंदराजांनी पूर्वार्ध आणि उत्तरार्धाची रचना पूर्ण करून पूर्वार्धात उपस्थित केलेल्या सायुज्यता मुक्तीचे पूर्ण निरूपण उत्तरार्धातील सातव्या अध्यायापर्यंत यथाशक्ती दिलेले आहे. पण पूर्वार्धातील नरसिंहाने मात्र पूर्वार्धावर प्रवचन केले आहे. येथेच त्याच्या कार्याची पूर्तता होते. असे असूनही पूर्वार्धावर प्रवचन करीत असता उत्तरार्धाची त्याला माहिती होती असेही दिसते.

‘तू म्हणशी माया कैशी। तरी उत्तरार्धी बूझसी। अनायासे ॥’ असे तो सांगतो. ‘एवं शबल त्वं पदार्थ। तो शोधन कैसा। ऐसे म्हणसी गा वत्सा। तरी उत्तरार्धी स्वेच्छा बुझशी तू ॥’ असेही हा पोथीकार सांगतो. येथे प्रणवपंची कृत्ये विस्तारून सांगितली आहेत पण उत्तरार्धात महावाक्याचा उपदेश आहे असेही तो सांगतो. त्याअर्थी पूर्वार्धाबरोबरच उत्तरार्धाचाही त्याला परिचय होता असे स्पष्ट आहे. पूर्वार्धाच्या आणि उत्तरार्धाच्या स्वतंत्र पोथ्या वेगवेगळ्या अस्तित्वात असाव्यात आणि नरसिंहाच्या काळापर्यंत तरी विवेकसिंधूची अठरा अध्यायी पूर्ण पोथी उपलब्ध नसावी असे दिसते.

उत्तरार्धात नृसिंह जयंतपाळ ह्यांची नांवे नाहीत. राजयोगी मुकुंदराजाचे नावही क्वचित येते. उत्तरार्धात हरिनाथ रामचंद्र, सुरेंद्रभारती आणि सारंगधर यांची नावे अंतर्भूत आहेत. सारंगधराचे नाव अठराव्या अध्यायाच्या समाप्तीनंतरच्या काही प्रक्षिप्त जाणवणाऱ्या ओव्यांतच असते. या व्यक्तींचा पूर्वार्धाशी कोणताच संबंध असावा असे वाटत नाही. (सारंगधराचे नाव असणारी ओवी यक्षदेववृद्धान्वयसार ग्रंथातून जी माहिती ज्ञात झाली त्या माहितीच्या आधारे बहुधा रचली गेली असावी) सुरेंद्र भारतीची नाममुद्रा हे उत्तरार्धाचे वैशिष्ट्य आहे. तो रामचंद्राचा गुरुबंधु आहे. सुरेंद्रभारती हरनाथांचा शिष्य आहे. त्यांचा आणि मुकुंदराजाचा अथवा जयंतपाळाचा कोणताच संबंध असावा असे पुरावे नाहीत. ‘लिहणार सुरेंद्रभारती’ असे बोबडेप्रतीतही आढळते. सुरेंद्रभारतीची

नाममुद्रा १८ व्या अध्यायातच असते. त्याअर्थी ' १८ अध्यायी विवेकसिंधूच्या ' कर्तृत्वात सुरेंद्रभारती आणि रामचंद्र यांची भूमिका महत्त्वाची असावी असे वाटते.

विवेकसिंधूचा उत्तरार्ध मुळात सात अध्यायाचा असून त्याचा विस्तार अकरा अध्यायापर्यंत होत गेला असे दिसते. त्यासाठी उत्तरार्धाची समस्या तपासून पाहाणे योग्य होईल.

' उत्तरार्ध '

उत्तरार्धाला महावाक्य असे संबोधिलेले आहे. 'जेथ महावाक्याचा विवरु। बोलिजैल स्वरुपाचा निर्धारु ॥ या ओवीवरून अथवा 'ते त्रिपदा महावाक्य । जेण्हे जीवेश्वरांसि हो ऐक्य । पदत्रयाची व्याख्या । आता निरुपीजैल ॥ ( उत्त० १– ५, ६ ) या ओवीवरून ते स्पष्ट आहे. महावाक्याचा प्रतिपाद्य विषय कोणता तेही कळण्यासारखे आहे. 'जे श्रद्धापूर्वक ऐकता । निःशेष फिटे भववेथा । आणि मुक्त सायोज्यता । ते सिद्धचि वोलगे ॥' या ओळींतून सायुज्यता मुक्ती हीच महावाक्याची मुख्य समस्या आहे. ते पूर्वार्धाच्या दुसऱ्या अध्यायातूनही कळते. 'हे महावाक्याचे रहस्य । जे जीवेश्वराचे सामरस्य । तेणे उपजे विरस । संसारसुखासी ( पूर्वार्ध– २–४३ ॥ ) '

– जीवशिवाचे सामरस्य हेच महावाक्याचे रहस्य आहे. पण वेदान्त निरुपणातही विवेकसिंधुकारांनी भक्तीची बैठक सोडलेली नाही. मग निर्गुणी भक्ती प्रेमळ। आपैसे होय ॥ ( पू. २–९६ ) अशी अभिव्यक्ती या पोथीकाराने दिलेली असून 'करावी ईश्वर भक्ती । अनन्यभावे' अथवा 'तेथे हृदयीच्या शेजारी । षोडशोपचारे पूजा करी । उपासावा श्रीहरी। अनन्यभावे ॥ या ओळीतून तसेच 'सगुण स्वरूप मायिक। ऐसे मानुनिया देख । जे न भजती कौतुक । ते मूढ जाणावे ॥' ( पू. ५.१९ ) या ओवीतून विवेकसिंधुकार पुढे असाही आग्रह धरतात 'म्हणूनि सर्वेश्वराचे भजन। काहीच नव्हे अप्रमाण । जे भक्तांसी कैवल्यसाधन । ज्ञानद्वारे ॥ ( पू. ५–२२ ) तात्पर्य भक्तीप्रवणता आणि सायुज्यतामुक्ती यांच्या निरूपणासाठी विवेकसिंधूची निर्मिती झाली आहे. जीवाची निर्गुण परमात्म्याशी जी तद्रूपता तीच सामरस्याची अथवा महासुखाची अवस्था होय, हेच महावाक्याचे सार आहे. आणि उत्तरार्धात सातव्या अध्यायात हेच सार विशद करून सांगितले आहे. सायुज्यता मुक्तीच्या निरूपणाने सातवा अध्याय संपतो. येथेच विवेकसिंधूच्या पूर्वार्धात उपस्थित केलेली समस्याही निराकृत होते. 'ही सायुज्यता मुक्ती। तुज सांगितली

अनुक्रमणिका





निगुती । जेथ नाही पुनरावृत्ति ।। काहीची पैं ।। ( उत्त. ७.१०५ ) या ओवीवरच महावाक्याची समाप्ती होणे योग्य आहे. कारण दुसऱ्या अध्यायात तीच समस्या उपस्थित केलेली आहे. पण काही विवेकसिंधूच्या पोथ्या याच अध्यायावर पूर्ण होतात. पण सात अध्यायानंतर पुन्हा चार प्रकरणांची भर घालून अकरा अध्यायाचा उत्तरार्ध हाच सांप्रत सर्वमान्य झाला आहे. ही शेवटची चार प्रकरणे मूळ उत्तरार्धाचा औरस भाग आहे अशा समजुतीनेच विवेकसिंधु आणि मुकुंदराज यांच्या संबंधीचे सारेच ऐतिहासिक निवेदन चुकलेले आहे असे वाटते.

उत्तरार्धातील ८ आणि ९ ही दोन प्रकरणे विवेकसिंधूच्या तत्वज्ञानाचा नैसर्गिक विकास दर्शवित नाहीत. मूळ विवेकसिंधूच्या प्रतिपाद्य विषयावर वेगळयाच विचारांचे कोणी कलम केलेले आहे असे दिसते. विवेकसिंधूतील महावाक्याची जी अभिव्यक्ती आहे त्या अभिव्यक्तीशी ८ आणि ९ या दोन प्रकरणातील अभिव्यक्तीचा पोत सुसंगत वाटत नाही. विवेकसिंधूतील पक्ष अज्ञानखंडनाचा पक्ष नसून तो शांकरभाष्याशी सुसंगत असा बिंबप्रतिबिंब-वादाचा पक्ष आहे. पण उत्तरार्धातील आठव्या अध्यायात अमृतानुभवातील उसनवारीने अज्ञानखंडनाचा दुबळा प्रयत्न दिसतो. सायुज्यतामुक्ती हीच महावाक्याची सिद्धता असून निरनिराळया दृष्टान्ताद्वारा महावाक्यात तिचे निरूपण केले गेले आहे. पण आठव्या अध्यायापासून हे विचारसूत्र खंडित झाल्यासारखे वाटते. सातव्या अध्यायात ‘ही सायुज्यता मुक्ती । तुज सांगितली निगुती । तेथे नाही पुनरावृत्ती । कदाचि पैं ।’ या ओवीत सायुज्यतामुक्ती सांगितली आहे आणि येथे प्रतिपादनाचा ओघही थांबतो. तो पुढे विस्तारला जाणार आहे अशी सूचना देणारे एकही विधान सातव्या अध्यायात नाही. पण आठव्यात मात्र एकदमच नवा विचार उपष्टिव स्वरूपाचा जाणवतो. ‘चौथी सगुण सायुज्यता । तेंही जाण मायानिर्मिता । तरी या मुक्ती आता । झणें साच मानिशी ।। या ओवीने सायुज्यतेचे खंडन आहे. शांकरोक्तीवरील हे प्रवचन सात अध्यायापर्यंत आटोपते. पण आचार्यांना अभिप्रेत नसलेल्या अज्ञानखंडनाच्या ओव्या अंतर्भूत करून आचार्यांच्या अद्वैतावर शैवाद्वैताचे कलम करून या दोन प्रकरणात ( ८ व ९ ) महाद्वैताची सिद्धता करून सांगितलेली आहे. सातव्या अध्यायात महावाक्याचा उपसंहार आहे अशी सूचना देणाऱ्या अनेक ओव्या आढळतात. पण पुढील चार अध्यायात महावाक्याचा निर्देश कुठेही नाही. आठव्या प्रकरणाचा विस्तार नवव्या प्रकरणात आढळतो आणि याच या प्रकरणाशी सुसंगत असणारे अद्वैती स्वरूपाचे सच्चिदानंदी प्रकरण आणि

या प्रकरणातील अंतिम ओवीत गुरुपरंपरा कथन कर अशी आज्ञा व त्या आज्ञापूर्तीसाठीच शेवटचा अठरावा अध्याय अशा क्रमाने विवेकसिंधूची अठरा अध्यायी पोथी विकसित होत गेलेली आहे. अठराव्या अध्यायातील गुरुपरंपरेत हरिनाथ, रघुनाथ याची नांवे आहेत. या गुरुपरंपरेचा आणि अस्सल विवेकसिंधूची रचना करणारे राजयोगी मुकुंदराज यांचा दूरान्वयानेही संबंध नाही. हरिनाथांचे शिष्य सुरेंद्रभारती आणि त्यांचे ज्येष्ठ गुरुबंधु रामचंद्र यांची प्रशंसा उत्तरार्धातील शेवटच्या प्रकरणात गौरविलेली आहे. विवेकसिंधूतील अठराव्या अध्यायातील नाममुद्रा सुरेंद्रभारतीची आहे. त्यामुळे ही पोथी सुरेंद्रभारतीने तयार केली असून ती तयार करण्यासाठी त्याला रामचंद्राने आज्ञा केली असावी. विवेकसिंधूतील अठराव्या अध्यायातील गुरुपरंपरा राजयोगी मुकुंदराजांची नसून ज्याने अद्वैती स्वरूपाच्या सच्चिदानंदी प्रकरणाची मूळ विवेकसिंधूत भर घातलेली आहे त्या रचनाकाराची आहे हे ठरविण्यासाठी या प्रकरणाचा पुनर्विचार होणे आवश्यक आहे. कारण अठरावा अध्याय हा अद्वैतीस्वरूपाच्या सच्चिदानंद प्रकरणाचा अनायासे झालेला विस्तार आहे.

## सतरावे सच्चिदानंदी प्रकरण

अठरा अध्यायी विवेकसिंधूचे पोथीत १७ ( अ ) हे द्वैती आणि १७ ( ब ) हे अद्वैती स्वरूपाचे प्रकरण असते. १७ ( अ ) हे द्वैती प्रकरण प्राचीन पोथ्यांतही आढळते. त्याचे पाठभेदही आहेत. त्यावरून मूळ विवेकसिंधूत ते पूर्वापार अंतर्भूत होते असे दिसते. एवढेच नव्हे तर महावाक्याचा मतितार्थु । बोलिला जो यथार्थु । विमृशिता लाभे परमार्थु । सच्चिदानंदु ।। ( १७ अ– ३५ ) असा महावाक्याचा सारांश याच अध्यायात विशद करून सांगितलेला आहे. १७ ( ब ) या प्रकरणापासून पुढे महावाक्याचा कुठेही निर्देश नाही. राजयोग, वेदान्त आणि सगुणभक्ती यांचा परस्पर संबंध प्रस्थापित करणारा, भक्तीवादाकडे झुकणारा असा काहीसा द्वैती स्वरुपाचा असा विवेकसिंधूतील तत्वज्ञानाचा गाभा लक्षात घेता १७ ( अ ) हे प्रकरणच मूळ विवेकसिंधूच्या प्रकृतीशी सुसंगत आहे. आणि १७ ( अ ) प्रकरणातील विचारांचा उपहास करून पूर्णाद्वैत प्रस्थापित करण्यासाठीच १७ ( ब ) ह्या प्रकरणाची रचना झालेली आहे.

'ग्रंथांतरी निरुपण यैसे । जे असत् जड दुःख असे । तयाचेनि निराशे । सच्चिदानंदु ।।' ( १७ ( ब ) २३ ) या ओवीतून देखील सतरावे ( ब ) प्रकरण 'सतरा ( अ ) नंतर अंतर्भूत झालेले आहे हे स्पष्ट आहे. 'ब्रह्म आले

सच्चिदानंद वशे । ऐसे म्हणता आले हांसे । महानुभावा ॥' ( १७ ब– २४ ) या ओवीतही १७( अ ) प्रकरणातील द्वैती विचारांचा उपहास आहे. त्यावरून सतरा (अ) हे प्रकरण विवेकसिंधूत मुळात अंतर्भूत असून, विवेकसिंधूचा सारांश सांगण्यासाठी त्याची रचना केली गेली आहे हे स्पष्ट असता, काही संशोधकानी १७ ( अ ) हे मूळ विवेकसिंधूच्या तत्त्वज्ञानाशी सारांशरूपाने सुसंगत असणारे प्रकरण वगळून १७ ( ब ) हे द्वैती प्रकरण कायम ठेवावे असा आग्रह धरून विवेकसिंधुकारावर अन्याय केलाच आहे पण स्वतःच्या शोध-बुद्धीचा उथळपणा दाखवून दिलेला आहे.

'परब्रह्म जाहले । सच्चिदानंद ॥' ( उत्त-७-८७ ) तसेच 'फिटे अज्ञान भुरेरे । आणि सच्चिदानंद ३ रे । परब्रह्म ते ॥ ( २–७३ या अनेक ओव्यातून प्रगट झालेला विवेकसिंधुकारांचा पक्ष संक्षेपाने १७ (अ) प्रकरणातून विशद करून सांगितला असता तेच प्रकरण वगळावे असा अभ्यासकांचा आग्रह अनाभ्यासाश्रयी आहे. 'त' प्रतीत अद्वैत विरोधी सतरावे ( अ ) प्रकरण अंतर्भूत असून ते काल्पनिक म्हणून वगळावे असा आशय दिसतो. पण या प्रतीवर कोणताच काळ नसल्यामुळे या प्रतीविषयी विचार करण्याची आवश्यकता नाही. 'त' प्रतीच्या लेखनिकाचे काळात विवेकसिंधूची अठरा अध्यायी पोथी पूर्णांशाने उपलब्ध झालेली होती एवढेच फार तर त्यावरून म्हणता येईल. आणि त्या कालखंडात १७ ( अ ) प्रकरण अंतर्भूत असणाऱ्या पोथ्या अस्तित्वात होत्या असे म्हणता येते. १७ ( ब ) प्रकरण मूळ विवेकसिंधूचा भाग नसून मूळ विवेकसिंधूशी विसंगत आहे आणि त्याची निर्मिती १७ ( अ ) नंतर आहे हे अंतर्गत पुराव्याने सिद्ध झाले असता सतरा ( ब ) हे प्रकरण काल्पनिक म्हणून वगळणे अधिक सोयीचे आहे. मूळ विवेकसिंधूत १७ ( ब ) हेच प्रकरण एकदा प्रक्षिप्त ठरले की अनायासेच अठराव्या अध्यातील गुरुपरंपरेचा संबंध तुटतो, आणि हरिनाथ व रामचंद्र या परंपरेचा मुकुंदराजांशी संबंध प्रस्थापित व्हावा यासाठी अन्यत्र प्रमाण उपलब्ध नसते.

महावाक्य या ग्रंथाचा उत्तरार्धात केवळ सात अध्यायापर्यंत विस्तार आहे. सात अध्यायापर्यंत राजयोगी मुकुंदराजांची नाममुद्रा आढळत नाही. विवेक-सिंधूच्या पोथीत पूर्वार्धात उपस्थित झालेली जीवशिवाच्या सामरस्याची अथवा शिवशक्ति सामयोगाची, राजयोगी अवस्था हीच उत्तरार्धात सातव्या अध्या-यात पूर्णविरामित होते. आणि या तत्वज्ञानाचा संक्षेप सतरा ( अ ) या प्रकरणातून कोणी तरी मूळ विवेकसिंधूत गोवलेला आहे. उत्तरार्धातील पहिली सात प्रकरणे जशी परस्परांशी विचारबद्ध आणि अनायासे विकसित होत गेलेली

आहेत तसे आठवे प्रकरण आणि नववे प्रकरण मात्र या उत्तरार्धात उपक्षिप्त असावे असे वाटते. आठवे प्रकरण अमृतानुभवी तत्वविचारांच्या अनुकरणातून निर्माण झालेले असून नववे प्रकरण शैवसिद्धान्त तत्त्वज्ञानाचा बोध करून देते. उत्तरार्धातील शेवटची चार प्रकरणे पश्चात विचाराचा परिणाम असून मूळ विवेकसिंधूशी या प्रकरणांचे कोणतेही नाते नसून, शैवाद्वैतातील अथवा अमृतानुभवी वळणाची तत्वे या प्रकरणात अंतर्भूत झालेली आहेत असे दिसते. उत्तरार्धातील सातव्या अध्यायात विवेकसिंधूच्या पोथीविषयी आणि मुकुंदराजाविषयी गौरवशाली शब्दांनी आदरिलेले आहे. कोणताच पोथीकार अथवा अभंगकार स्वतःला बहुवचनी नाममुद्रेने संबोधित नसतो. पण 'मुकुंद म्हणती' किंवा राजयोगी मुकुंद अशा ज्या नाममुद्रा पोथीतून आढळतात त्यावरून विवेकसिंधूची उपलब्ध पोथी मुकुंदराजाच्या शिष्याची कृती आहे हे उघड आहे. विवेकसिंधूच्या पूर्वार्धाचे मराठी भाषांतर जयंतपाळाने नरसिंहाकडून करवून घेतले आहे. उत्तरार्धात अठराव्या अध्यायात मुकुंदराजांना राजयोगी अशा पदाने गौरविलेले आहे. ( १८–१३७ ) उत्तरार्धातील शेवटची चार प्रकरणे सुरेंद्रभारतीने रचलेली आहेत असे म्हणता येते. सुरेंद्रभारतीचा कालखंड स्पष्ट झाला तर विवेकसिंधूच्या मराठी पोथीचा कालखंड स्पष्ट होण्यास मदत होणार आहे. पण सुरेंद्रभारतीचा कालखंड ठरविण्यासाठी देखील अनुमानाचाच आश्रय घ्यावा लागतो.

## सुरेंद्रभारती

भारती या उपनामावरून तो यजुर्वेदी ब्राह्मण असून चैतन्य परंपरेचा असावा असे स्पष्ट आहे. संपूर्ण विवेकसिंधूवर अद्वैती चैतन्यसंप्रदायाचा प्रभाव असून या पोथीत परमतत्त्वाला चैतन्य या अभिधानानेच सर्वत्र संबोधिलेले आहे.

लिहिणार सुरेंद्र भारती । संमत ( १२४४ ? ) प्रती ॥
विजया दशमी मुहूर्ती । सूर्य माध्यान्ही येता ॥
वेनगंगेचे तीर । अंबनगरी असे थोर ॥
श्री गुरु समोर । ग्रंथ समाप्त जाहला ॥

– या ओव्या जर लक्षात घेतल्या तर सुरेंद्रभारतीने श्री गुरुसमोर आंभोऱ्यास ग्रंथलेखन समाप्त केले असा स्पष्ट उल्लेख या ओवीतून लक्षात येतो. हरिनाथ हेच सुरेंद्रभारतीचे गुरु आहेत. त्यामुळे हरिनाथ चैतन्यसंप्रदायी असावे. त्यांचे वास्तव्य आंभोऱ्यास असावे. आंभोरे या स्थानाचे जे माहात्म्य आहे ते मुकुंदराजांच्या संदर्भात नसून हरिनाथांच्या, आणि सुरेंद्रभारतीच्या

अनुक्रमणिका

संदर्भातच मान्य करावे लागते. मुकुंदराज, जयंतपाळ, नरसिंह, यांच्यापैकी एकाही व्यक्तीच्या कर्तृत्वाचा आंभोऱ्यासी संबंध असावा अशी सिद्धता देणारा एखादाही पुरावा अस्पष्ट का असेना पण कुठेही उपलब्ध झालेला नाही. त्यासाठी मुकुंदचरित्राला उपयोगी जी वाङ्मयीन साधने आहेत त्यांचा कालक्रमानुसार अभ्यास मार्गदर्शक होईल अन्यथा आप्तवाक्यप्रामाण्याने कोणताच बोध होणार नाही.

(१) मृत्युंजयाच्या ग्रंथात मुकुंदराजांची गुरुपरंपरा आहे पण त्यांचा काळ मात्र स्पष्ट नाही (२) रेणुकादासाने मुकुंदराजांचा नामोल्लेख केलेला आहे. (३) दासोपंतानंतरच्या कालखंडात ( शके १५५० नंतर ) त्यांचे नांव एकनाथानंतर ठेवले आहे. (४) तुकारामांनी जयंतपाल आणि मुकुंदराज यांचे नाते सांगितले आहे. वामनपंडित, मोरोपंत यांच्या काव्यात मुकुंदराजांचा केवळ नामोल्लेख आहे. यावरून मुकुंदराजांच्या काळासंबंधी अंदाज घेता येतो. नामदेव आणि एकनाथ ह्यांनी मुकुंदराजांचा उल्लेख केला नाही. अद्वैतवेदान्त आणि भागवतधर्म यांची सांगड घालणाऱ्या एकनाथांनी मुकुंदराजांचा मराठी कवींच्या यादीत नामनिर्देश केला नाही, ही घटना मुकुंदकालावर प्रकाश टाकणारी आहे. नामदेवांच्या अभंगगाथेत निरनिराळ्या प्रसंगी उपस्थित असणाऱ्या संतांचे मांदियाळीत भानुदासापर्यंतचे उल्लेख आहेत, पण मुकुंदराजांचा मात्र नामनिर्देश नाही. त्याअर्थी मुकुंदराजांची ग्रंथरचना मराठीत नसून संस्कृतात असावी. आणि तिचे भाषांतर मात्र एकनाथोत्तरकाळांत झाले असावे. या तर्काने मुकुंदराज हे आद्य मराठी कवी म्हणून अनायासेच बाद होतात. जयंतपाळ आणि मुकुंदराज यांच्या विषयीच्या ज्या कथा आहेत त्या कथांच्या काळाचा मागोवा घेणे योग्य होईल. *

कृष्णदयार्णवाच्या आरतीत जयंतपाळ आणि मुकुंदराज यांचा संबंध दिलेला असून हा काळ शके १६५० चे सुमारास ठेवता येतो. भविष्योत्तरपुराणांतर्गत योगेश्वरीमहात्म्यातील सिद्धमहात्म्यात जयंतपाळ आणि मुकुंदराज यांची कथा सांगितली आहे. यातील माहिती महत्वाची आहे. 'योगधारणया काशीं गत्वा तत्र सदास्थितः ॥ ग्रंथाज्ञानाविधांश्चैव–सर्ववेदान्तशास्त्राणांसारमुद्धृत्य ... विवेकसिंधुपरमामृतं सचाकरोत् सुधीः ।' या श्लोकांच्या ओळीतून विवेकसिंधूची निर्मिती काशीला झालेली आहे असे स्पष्ट आहे. त्याअर्थी हा ग्रंथ संस्कृ-

---

* मुकुंदराजाच्या चरित्राचा शोध घेता येणारी वाङ्मयीन प्रमाणे प्रा. कृ. पां. कुळकर्णी ह्यांचे ग्रंथांतून घेतलेली आहेत. त्यांचे ऋण मान्य आहे.

तातच बद्ध असावा. जयंतपाळ मुकुंदराजाचा शिष्य होता अशीही माहिती या श्लोकातून प्राप्त होते. काशीला मराठीत काव्यरचना होण्याची शक्यता नाही.

भविष्योत्तरपुराण हे भविष्यपुराणाचे शेवटचे प्रकरण आहे. आणि भविष्य-पुराणात विक्टोरिया राणीचाही उल्लेख आहे. त्याअर्थी भविष्यपुराण आणि भविष्योत्तर पुराणाचा काही भाग अर्वाचीन असावा असे दिसते. भविष्योत्तर पुराणात ज्याअर्थी अकबराचा उल्लेख आहे त्याअर्थी हे पुराण अकबराच्या काळानंतरचे म्हणजेच शके १५५० नंतरचे असावे. या पुराणातील जयंतपाळाच्या कथेत त्याला जैनधर्मी असे म्हटले आहे.

उद्धवसुतकृत रामदास चरित्रात ( शके १६९६ ) मलयगंधर्वाची कथा असून त्यांतही मुकुंदराजांनी जयंतपाळाला बोध केला अशी कथा आहे. हीच कथा महीपतीच्या संतविजयात सांगितलेली आहे. ( शके १७१० ) या निरनिराळ्या ग्रंथातून ( १ ) मुकुंदराजांचा संबंध आंबेजोगाईशी दाखविला असून जयंत-पाळही त्याच प्रदेशाचा स्वामी असावा असे दिसते. ( २ ) या कथांतून वैन-गंगेच्या तीरावरील आंभोऱ्याचा बोध होत नाही ( ३ ) या संपूर्ण कथांत हरिनाथ, रामचंद्र यांचा नामनिर्देश नाही. ( ४ ) मुकुंदराजांच्या गुरुपरंपरे-विषयी पूर्णपणे मौन आहे. ( ५ ) हरिनाथ आणि मुकुंदराज यांचा संबंध स्पष्ट व्हावा असे कोणतेच प्रमाण या ग्रंथातून उपलब्ध नाही :

हरनाथ रामचंद्र सुरेंद्रभारती यांची परंपरा देणारा पुरावा फक्त यक्ष-देवआम्नायातून मिळतो ( शके १६६१ ) यात जयंतपालाचा उल्लेख नाही. पण हरिनाथांच्या जीवनासाठी हा पुरावा महत्त्वाचा आहे.

गुरु आदिनाथु शिष्य हरिनाथु । तेथे रघुनाथु बोधियेला ।।
वैनगंगेच्या तीरी अंबावती पुरी । भेटला मुरारी रामदेवा ।।
रामासि वेदान्तु नागेन्द्रा सिद्धान्तु । गुरु नागनाथु आम्हासवे ।।

— या अभंगात हरिनाथाचे वास्तव्य आंभोऱ्यास होते असे स्पष्ट सांगितलेले आहे. यक्षदेव वृद्धान्वयात मात्र मेघचंद्राने जयंतपाळाची वेगळीच कथा सांगितलेली आहे. अपत्य हीन असणाऱ्या जयंतपाळाची मानसिक दुःखी अवस्था नाहीशी करण्यासाठी विवेकसिंधूची पोथी सांगितली असा त्या ग्रंथातून बोध होतो. केशवजयरामाच्या भक्तिरहस्यात मुकुंदराजाविषयीचा महत्वाचा उल्लेख नाही. ( शके १७७९ )

मुकुंदराजांची कथा सांगणारे ग्रंथ शके १५५० नंतरचे कालखंडातील आहेत. त्यांतही शके १६५० नंतरच्या ग्रंथातून फक्त यक्षदेववृद्धान्वयातूनच

हरिनाथ आणि मुकुंदराज यांचा नातेसंबंध स्पष्ट होतो. मुकुंदराजांच्या जीवनाविषयी जो इतिहास मिळतो तो सर्वत्र सारखा नाही. चरित्रकारापरत्वे मुकुंदराज आणि जयंतपाळ यांच्याविषयीच्या कथा भिन्न आहेत. त्याअर्थी मुकुंदराजांच्या विवेकसिंधूच्या पोथीमहात्म्याने अथवा त्यांच्या पंथाने ज्या स्थळांना पावित्र्य प्राप्त झाले होते त्या स्थळाच्या अनुरोधाने मुकुंदराजांविषयीच्या दिव्य कथांचा जन्म झाला. स्थळमहात्म्याने निरनिराळ्या कथांचा जन्म होतो हे सांगावयास नको. मुकुंदगढी, जयत्पाळ, अश्वदरी, सारंगपूर अशा निरनिराळ्या स्थळांचे महात्म्य लक्षात घेऊनच मुकुंदराजाविषयीच्या दिव्यकथांचा जन्म झाला आहे. आणि त्यामुळेच या कथांतून मुकुंदराजांच्या जीवनासंबंधी एकवाक्यता नाही.

यक्षदेववृद्धान्वयातील जी माहिती उपलब्ध आहे त्यांत मात्र हरिनाथ–मुकुंदराज–जयंतपाळ, सारंगधर अशा निरनिराळ्या व्यक्तींचे नाते स्पष्ट करणारा अभंग उपलब्ध आहे. पण यक्षदेववृद्धान्वयाचा कर्ता मेघचंद्र यांचा काळ स्पष्ट नाही. त्यामुळे मेघचंद्राने यक्षदेववृद्धान्वयात दिलेली माहिती ही ऐतिहासिक स्वरूपाची नसून अठराअध्यायी विवेकसिंधूत सारंगधराचा निर्देश असणारी शके अकराशेदहाची ओवी ज्या काळात अंतर्भूत झाली त्या काळानंतरच्या पोथीतून त्याने ती माहिती दिलेली आहे. कारण यक्षदेव नावाचे आम्नायप्रमुख हेच पंधराव्या शकाचे काळातील आहेत. मेघचंद्राच्या 'यक्षदेव वृद्धान्वयात' राक्षसतागडीच्या युद्धापर्यंतचा इतिहास आढळतो. (शके १५०० चे दरम्यान) यक्षदेव ज्या नागनाथांचे शिष्य आहेत ते नागनाथ चक्रधर शिष्य नसून हरिनाथशिष्य आहेत. तात्पर्य हरनाथ–नागेंद्र–आणि यक्षदेव ही परंपरा १४ व्या व १५ व्या शकातच ठेवावी लागते. तात्पर्य मेघचंद्रकृतयक्षदेव आम्नाय हा ग्रंथच मुळात सतराव्या शकाच्या दरम्यानचा असता, प्रादेशिक अस्मिता धारण करणाऱ्या संशोधकांनी मेघचंद्रयक्षदेव आम्नायातील पुरावा ग्राह्य ठरवून, राजोरा 'रोहणा' हे झाडीमंडळातील स्थान भंडाऱ्याकडे शोधून काढण्यास हाच पुरावा का ग्राह्य धरावा? आणि त्यापेक्षाही अधिक विश्वसनीय असे अधिक प्राचीन पुरावे नाकारण्यास कोणती कारणे घडली आहेत? त्याचे दिग्दर्शन वैदर्भीय संशोधकांच्या संशोधनलेखनात आढळत नाहीत.

मुकुंदराज विदर्भाचे होते असे सांगताना मराठीच्या आद्य कवीला जन्माला घातल्याचे मातृत्व विदर्भाला मिळत असले तरी मराठी भाषेच्या आणि तत्वज्ञानाच्या विकासनाचे संपूर्ण सूत्र या संशोधकांनी प्रादेशिक अस्मितेच्या धुंदीत तोडून टाकण्याचा प्रमाद तर केलेला असतोच, पण या असल्या

प्रमादाची दलाली करण्यासाठी मराठी भाषेच्या इतिहासकारांनी पूर्णतः अनाभ्यासी वृत्तीचेच प्रदर्शन केले असते.

आंभोरे हे स्थळ वैनगंगेच्या तीरी आहे. याच स्थळी हरिनाथ प्रगटले असा विवेकसिंधूत उल्लेख आहे. ( १८–३८ ) कांही संशोधकानी या अंबानगरीचा संबंध आंबेजोगाईशी जोडून, हरनाथांनाही तेथे नेले. येथेही चूक झालेली आहे. आंबेजोगाईस हरिनाथांच्या जीवनाची कोणतीही पदचिन्हे उमटलेली नाहीत. हरिनाथांची समाधी आंभोऱ्यास आहे. अन्यत्र ती कोठेही नाही. येथेच विवेकसिंधूची अठरा अध्यायी पोथी जन्मास आलेली आहे. ज्या अठराव्या अध्यायात आंभोऱ्याचा निर्देश आहे त्या अध्यायाची निर्मिती देखील हरिनाथ व रामचंद्र यांच्या प्रशंसेसाठीच उतरलेली आहे. हरिनाथ रामचंद्र यांचा गुणगौरव सुरेंद्रभारतीने केलेला आहे. तात्पर्य आंभोरा या स्थलाचे महात्म्य लक्षात घेताना, हरिनाथ, रामचंद्र व सुरेंद्रभारती यांचेच कर्तृत्व लक्षात घ्यावे लागते. आंभोऱ्याचा मुकुंदराजांच्या जीवनाशी कसलाही संबंध दूरान्वयानेही जोडता येत नाही. आंभोरा या स्थलाचे महात्म्य विवेकसिंधूच्या पुनर्लेखनाशी जडलेले आहे. येथे सुरेंद्रभारतीच्या चैतन्यपरंपरेचा शोध घेताना आंभोऱ्याचा विचार करावा लागतो.

अन्वयसारातील हे अवतरण हरिनाथांच्या काळावर प्रकाश टाकण्यास महत्वाचे ठरावे. 'आपण हरिनाथे रघुनाथशिष्य केला तो वडीलशिष्य, तदनंतर सुरेंद्रनाथ, भारतीनाथ, नागार्जुन जनार्दन आदि छप्पन शिष्य केले त्यात नागार्जुनभटास आचार्यत्व देऊन महात्मामार्ग प्रगट केला.' याचाच अर्थ असा की नागार्जुनाचा महात्मामार्ग हरिनाथांच्या पंथातून उद्भवलेला आहे. महात्मापंथ हाच महानुभाव पंथ होय. या पंथाचे अस्तित्व शके ११९० पूर्वी मान्य करता येत नाही. असे असता ज्या काळात महात्मापंथाचा निर्देशही नाही त्या काळात ( शके १११० मध्ये ) हरिनाथांच्या जीवनाचा बोध करून देणारी पोथी अस्तित्वात यावी हे इतिहासाला धरून नाही. कारण हरिनाथांचा जीवनकाळ चक्रधरानंतर निर्धारित करावा लागतो. तात्पर्य आंभोऱ्यास ज्या विवेकसिंधूचे लेखन झाले तो काळ भविष्योत्तर पुराणानंतरचा, व महात्मापंथाचे प्रवर्तन झाल्यानंतरचा आहे. म्हणून या प्रकरणातील शके १११० ची कालखंडाची ओवी प्रक्षिप्त ठरते. अथवा ती १७१० शकाची असावी असे म्हणावे लागते. आम्नायातील नागेंद्र अथवा नागनाथ आणि अन्वयसारातील महात्मामार्गाचा प्रवर्तक म्हणून परिचित झालेला नागार्जुन या एकच व्यक्ती होत्या हे निर्विवाद आहे. कारण दोघांचाही संबंध हरिनाथांशीच आहे. राघव आणि

नागनाथ हे हरिनाथांचे दोन शिष्य असून त्या दोघांनी वेगळे पंथ जन्मास घातले याचा पुरावा म्हणून हे महत्वाचे प्रमाण आहे.

राघवचैतन्य आणि नागनाथ ह्यांच्या कालखंडावर प्रकाश टाकण्यास स्मृति स्थळातील एक स्मृती महत्वाची आहे.

'राघव चैतन्य ते संन्यासी, ... दीली सुलतानाचे ... माहामद सुलतानाचे सभेसि ... सुलतान महमुदापासी गोष्टी करीत होते. तंव राघव चैतन्ये म्हणि ... नामदेवभटो नामू मार्ग एकु उदैला असे. ऐसे बोलोनि उठला तंव महंमुद सुलताने भणि० ते जैसे असे तैसे आसो. तुम्ही आणिक गोष्टी करा ... वा. ना. देशपांडे संपादित[९] या स्मृतिस्थळातून जी माहिती मिळते ती अशी : नागदेवानी भटमार्गाचे प्रवर्तन केले. अन्वयसारातही भटमार्गाचे प्रवर्तन नागार्जुनाने केले असेच सांगितले आहे: नागदेवाने भटमार्गाचे प्रवर्तन केले या घटनेविषयी राघवचैतन्याच्या मनात अढी असून ती घटना वर्तमानकालीन आहे असेच राघवचैतन्याच्या संवादातून प्रगट होते. राघव चैतन्याच्या मनातील ही अढी लक्षात घेऊन महमूद सुलतानाने तो वाद बंद केला असेही दिसते. हा सुलतान दिल्ली येथे राज्य करीत आहे. इ. स. १५७२ चे सुमारास म्हणजेच शके १४९४ च्या सुमारास अकबराने दिनेइलाहीच्या प्रस्थापनेसाठी जे वाद घडवून आणलेत त्या वादाची स्मृती या स्मृतिस्थळात नोंदविली आहे. राघवचैतन्य, महात्मामार्गाचे प्रवर्तक नागनाथ आणि त्यांचे गुरु हरिनाथ यांचा कालखंड अशा रीतीने शके १४५० ते १५०० चे दरम्यान ठरवावा लागतो. यक्षदेव यांच्या कालखंडावरून देखील नागनाथ आणि नागनाथांचे गुरु हरनाथ याच काळात समाविष्ट होतात. कारण चक्रधराचे शिष्य नागदेवाचार्य यांनी वेगळ्या मार्गाचे प्रवर्तन केले नाही हे डॉ. वि. भि. कोलते यांचे मत लक्षात घेणे आवश्यक आहे.[१०] श्री चक्रधरांच्या मुखातूनही भटमार्ग असा शब्द निघालेला नाही.[११] त्यामुळे राघव चैतन्यांनी ज्या नागदेवांचा निर्देश केला तो चक्रधरांचे काळातील नसून हरनाथांच्या काळातील वा यक्षदेवांच्या काळातील आहे. महानुभाव आणि भटमार्ग ही नावे पंधराव्या शकापासूनच परिचित होतात. तत्पूर्वी पंथविशेष म्हणून त्या नावांचा परिचय होत नाही.

९. स्मृतिस्थळ–अधिकस्मृती– ९५ पान. १४.

१०. महानुभाव संशोधन. पान ३१.

११. तत्रैव – पान ३३.

उपलब्ध प्रमाणांच्या आधारे हरिनाथ आणि रामचंद्र यांचा कालखंड चौदाव्या शतकाच्या आधी ठरविता येत नाही. त्याअर्थी हरनाथांचा निर्देश असणारी पोथी ही १४५० शकानंतरची पोथी आहे. या दृष्टीने ' शके अकराशे दहा ' ही याच अध्यायात अंतर्भूत असल्यामुळे ती प्रक्षिप्त ठरते. ही ओवी प्रक्षिप्त ठरली की शके १५५० चे आधी विवेकसिंधूची पोथी उपलब्ध झालेली नाही हे लक्षात घेऊन विवेकसिंधु एकनाथोत्तरकाळातील पोथी म्हणूनच मराठी साहित्याच्या इतिहासात तिची नोंद करावी लागते. हरनाथांच्या शिष्यावळीत ज्या सुरेंद्रभारतीचे नाव अंतर्भूत असते त्याचाही कालखंड नागदेवाचे आसपास ठरवावा लागतो. तात्पर्य विवेकसिंधूत जी व्यक्तिनामे आढळतात त्यांचा काळ कोणत्याच प्रमाणांवरून शके १४५० चे आधी निश्चित करता येत नाही यामुळे विवेकसिंधूची पोथी पंधराव्या शतकातील आहे.

## चैतन्यपंथ आणि विवेकसिंधु

विवेकसिंधूची पोथी चैतन्यपंथाच्या छायेखाली आहे. तिसऱ्या अध्यायात परमतत्त्वाला चैतन्य अशाच नावाने संबोधिलेले आहे. अठराव्या अध्यायातही परमतत्वाला ' चैतन्य ' असेच म्हटले आहे.

' तु चैतन्यरूप हे चित्ति । तु स्वसंवेद्यु संवित्ति '

आंभोऱ्यास चैतन्येश्वराचे मंदीर आहे. आणि तेथेच हरिनाथाची समाधी असून ते स्थळ महानुभावीयांस पवित्र आहे. यावरून हरनाथ हे चैतन्यसांप्रदायाचे आद्य प्रवर्तक होते असे ठरते. हरिनाथांची समाधी ज्याअर्थी महानुभावांना वंदनीय आहे त्याअर्थी नागनाथांचा भट मार्ग हा हरनाथांपासूनच उदयाला आला आहे हेही स्पष्ट आहे. चैतन्यपंथ हा शांकरद्वैताच्या विकासातून उद्भवलेला पंथ होता. या पंथातील साधकांना भारती या उपनावानेच संबोधिलेले असते; आणि हा पंथ यजुर्वेदी ब्राह्मणांचा असतो. महानुभावी तत्वज्ञानाचा विकास होत असता जे निरनिराळे आम्नाय वेगळे झाले त्यांत ' कवीश्वर-आम्नाय ' शांकरवेदान्ती स्वरूपाचा व अद्वैती आहे. चौदाव्या शतकापासून महानुभावी विचारसरणीतून चैतन्यवादाचे वेदान्ती स्वरूपाचे अद्वैतीतत्वज्ञानाचे रोपटे उगवले, आणि हरनाथांच्या शिष्यशाखेत दोन महत्वाचे आम्नाय वेगळे झालेत. ( १ ) नागनाथाचा सिद्धान्ती स्वरूपाचा भट मार्ग ( २ ) राघवांचा अद्वैती स्वरूपाचा वेदान्ती चैतन्यमार्ग. विवेकसिंधूचे पोथीत महानुभावी चैतन्यमार्गाचे तत्वज्ञान अंतर्भूत आहे यासाठीच ती वेदान्त्यांना आणि महानुभवीयांना सारखीच पवित्र ठरली आहे. विवेकसिंधूत अठराव्या अध्यायात मुंकुदराजाची परंपरा

सांगितली नसून हरनाथांपासून प्रवर्तित झालेल्या चैतन्यपंथाची परंपरा दिलेली आहे. त्यांत नागनाथांचे नाव नाही कारण नागनाथ व रामचंद्र यापासून महानुभवीयांत भेद झाले आणि नागनाथांनी चैतन्यपरंपरेपासून भटमार्ग वेगळा केला असल्यामुळे त्यांचे नाव चैतन्यपंथी विवेकसिंधूत अंतर्भूत नाही.

महानुभावी तत्वज्ञानाला छेदणारी विवेकसिंधूची पोथी महानुभावीयांस पवित्र का वाटते त्याचाही शोध घेतो येतो. यासाठी जयंतपाळाविषयी विचार होणे आवश्यक आहे.

## जयंतपाळ–महानुभाव

यक्षदेव वृद्धान्वयात जयंतपाळाच्या प्रभावळीचा इतिहास मिळतो. हा पुरावा वगळल्यास जयंतपाळ इतिहासाला ज्ञात नाही. त्याचा काळ शोधण्यासाठी इतिहासकारांनी निरनिराळ्या राजवंशावळी शोधून पाहिल्या आहेत, पण त्यांतही त्याचे नाव आढळले नाही. विशेष म्हणजे तो एखाद्या विस्तृत प्रदेशाचा राजा असावा अशा कल्पनेने त्याचा शोध घेणे चुकीचे आहे. कारण विवेकसिंधूत फक्त पूर्वार्धात एकाच ओवीत त्याचा निर्देश आहे आणि तोही राजा या अर्थाने नाही. जैतपाळाला तशा विशेषणाने गौरविलेले नाही. एखाद्या जहागिरीचा तो सामंत असू शकतो. मराठी विवेकसिंधूची अठरा अध्यायी पोथी निर्माण झाल्यानंतर यक्षदेव वृद्धान्वयातील माहिती संपादित केली गेली असल्यामुळे यक्षदेव वृद्धान्वयावरून कोणताही बोध होण्यासारखा नाही. 'खानदेशात तापी तटाकी सारंगपूर नावाचे खेडे असून त्याच्या जवळच जैतगड नावाचा किल्ला आहे. या ठिकाणी महानुभावांचा मठ आहे.'[१२] त्यावरून वृद्धान्वयाच्या लेखकाने तारतम्याने जयंतपाळाविषयी माहिती दिली असे दिसते : शारंगधराचे नावही एकाच ओवीत अंतर्भूत असते. ज्याकाळी विवेकसिंधूच्या पोथीत अठराव्या अध्यायाच्या शेवटी 'शके अकराशे दहा' ही कालखंडाची ओवी अंतर्भूत झाली त्याकाळी कदाचित सारंगधर नावाचा राजा राज्य करीत असावा. सारंगधराचा शोध शके १११० ऐवजी शके १७१० मध्ये घ्यावा लागेल. यक्षदेव वृद्धान्वयसाराच्या ( शके १६६१ ) अवतीभवती त्याची कालमर्यादा असावी.

जयंतपाळाला जैनराजा म्हणूनही संबोधिलेले आहे. खेरल्याच्या अभिलेखात त्याला 'लाडदेशाचा' असे निर्दिष्ट केलेले आहे. अन्यत्र तो ब्राह्मण जातीचा होता असेही म्हटलेले आहे.[१३] चक्रधर गुजराथेतून महाराष्ट्रात भ्रमण

१२. ज्ञानदेवी. रा. ग हर्षे. संशोधनसाहित्य. पान ८.

१३. प्रा. कृ. पां. कुलकर्णी पूर्वोक्त ग्रंथ पान ६८.

करीत आले तेही लाटदेशीयच होते. गुजराथेतील जैनांनी कृष्णभक्ती स्वीकारली होती. कृष्णभक्ती आणि संन्यास या साम्यामुळे आरंभी महानुभावीय पंथाला सामान्य जनता जैनपंथीय अशा दृष्टीने लक्षात घेत असावी. लाट हे आरंभी जातीवाचक नाम नसून ते प्रदेशवाचक असावे. जयंतपाळाचा धर्म 'लाटदेशीय' म्हणजेच जैन असावा अशा चुकीच्या कल्पनेने त्याच्यावरील कथांची रचना झाली. खेरल्याच्या अभिलेखावर कालमुद्रा आहे. पण ती इतकी पुसलेली आहे की ज्याला जसे वाटेल तसे त्याने कालमुद्रेचे आकलन करून घ्यावे. खेरल्याच्या अभिलेखातून जयंतपाळाच्या कालखंडावर कोणताच प्रकाश पडण्यासारखा नाही. महात्मा, महानुभव ही विवेकसिंधूतील नामे देखील पंथनामे असावीत असे वाटते. 'म्हणोनि विवेकसिंधु जावे। ग्रंथु कीजैल शुद्धभावे : तया अवधान करावे। म्हणे मुकुंदराजु ॥ या ओवीतून हा ग्रंथ कुणाला तरी सांगितला आहे असे स्पष्टच होते. तसेच 'गुरुशिष्याचेनि संवादे। जे बोलिजैल विनोदे। ते आइक विनोदे। महानुभाव ॥' या ओवीवरून ही पोथी महानुभवीयांना सांगितलेली आहे असेही म्हणता येते. पण या महानुभावी शिष्याचा विवेकसिंधूत सर्वत्र अनुनय आहे वेदान्तदर्शनासमोर अन्य दर्शने जंबुकासारखी आहेत असे जरी विवेकसिंधूत म्हटले असले तरी या पोथीत महानुभावी तत्वज्ञानाचा कुठेही उपहास केलेला आढळत नाही. मुक्तीचे तत्वज्ञान समजून घेण्याच्या उद्देशाने ज्या जयंतपाळाने ब्राह्मणांचा छळ केला त्या जयंतपाळाच्या कुकर्माविषयी पोथीत अवाक्षर तर नाहीच पण तू पूर्णचंद्र आहेस, तुझ्या गुणगणनेस उपमा नाही अशा विशेषणांनी जयंतपाळाला गौरविलेले आहे. त्याअर्थी हा पोथीकार जयंतपाळाचा आश्रित असावा असेही म्हणता येते. महानुभवीय पंथाला ईश्वरसायुज्यता अभिप्रेत असते. वेदान्त्यांना ती अभिप्रेत नसते. महानुभावियांचे ब्रह्म ईश्वरस्वरूपी चिदानंदी आहे. वेदान्त्यांचे ब्रह्म निर्गुण निर्विशेष आहे. अद्वैत तत्वज्ञानात मुक्ती अभिप्रेत आहे काय ? याच प्रश्नाच्या उत्तरासाठी विवेकसिंधूची रचना असून, जयंतपाळ आणि मुकुंदराज यांच्या संवादात ह्याच प्रश्नाची सर्वत्र चर्चा आहे. जयंतपाळाच्या प्रश्नांना उत्तर देण्यासाठी विवेकसिंधुकाराने एका विशिष्ट पंथाचा अभिनिवेश धरलेला नाही. ब्रह्म आणि माया यांचे द्वैत सांगताना विवेकसिंधुकार कधी सांख्यमत मांडतात, कुठे शंकराचार्यांच्या भाषेत तिला ब्रह्माचा विवर्त असेही म्हणतात आणि अन्यत्र तिला परमपुरुषाची निजशक्ति असेही गौरवितात. तात्पर्य जयंतपाळाला मुक्तीचे तत्वज्ञान सांगताना सांख्य, शैवसूत्र आणि अद्वैतवेदान्त यातील विचारांचा आश्रय घेऊन या पोथीकाराने सायुज्यता

मुक्तीचा पक्ष मांडलेला आहे. पूर्वार्धात जीव आणि जगत् यांचे नाते सांगितले असून 'ब्रह्म' या तत्वाचा बोध आहे. येथे विवेकसिंधुकाराने सांख्यमत आणि बृहद्आरण्यक उपनिषदातील ब्रह्मसिद्धीचा पक्ष घेतलेला आहे. उत्तरार्धात आत्मतत्वाचा शोध आहे. महानुभावी पंथाने द्वैत वादाची बैठक सोडून ज्या काळी अद्वैतवादाची कास धरून वेदांताच्या पंगतीला आपला पक्ष बसविला त्याकाळची ही पोथी आहे. याचाही पुरावा पोथीतून मिळतो :

वेदवाक्याचा विरोधु । तो पक्ष नोहे प्रमाणसिद्धु ॥
म्हणोनि भेदाचा निशेधु । करिती महानुभाव ॥ १५-२९ ॥

किंवा

नित्य तो परमात्मा । अनित्य प्रपंच अनात्मा ॥
हा विवेक बोलिजे महात्मा । वेदांतशास्त्री ॥ ७-८० ॥

या ओव्यातील महानुभाव, महात्मा ही विशेषणे ज्या व्यक्तीसाठी वापरलेली आहेत ती व्यक्ती जयंतपाळ असून महानुभाव हे द्वैताचा निषेध करतात. असाच विवेकसिंधुकारांचा पक्ष आहे. महानुभावी जयंतपाळाला वेदान्तशास्त्राचा परिचय देऊन महात्मामार्गावर वेदान्ताचे पांघरूण घालण्यासाठी, आणि जयंतपाळाला. शांकरभाष्य सांख्यमत आणि शैवाद्वैत समजावून देण्यासाठी ही पोथी जन्मास आली आहे.

तात्पर्य, खेरल्याच्या अभिलेखातील लाटदेशीय जयंतपाळ हा जैन नसून तो गुर्जरही असू शकतो. किंवा चक्रधराचा धर्म 'लाटदेशीय' या अर्थाने तो महानुभाव असू शकतो. विवेकसिंधूची दोन स्वतंत्र प्रकरणे असावीत, आणि मुळात ही दोन्ही प्रकरणे संस्कृतात असावी. पूर्वार्धात पंचीकरण आणि उत्तरार्धात महावाक्य यांचे विशदीकरण असावे. पूर्वार्धाचे मराठी भाषांतर जयंतपाळाने नरसिंहाकडून करवून घेतले. आणि येथे नरसिंह आणि त्याचे कर्तृत्व संपतात. उत्तरार्धाचे भाषांतर कोणी केले त्याचा मात्र उत्तरार्धातून शोध घेता येत नाही.

## मुक्तिनाथ मुकुंद

मुकुंदनावाचे अनेक साधक मध्ययुगात नांदले याचे अनेक पुरावे सापडतात. मुक्तिनाथ मुकुंदाचा शोध घेऊन त्यांचे मुकुंदराजापासून वेगळेपण सिद्ध करण्यासाठी विवेकसिंधूच्या मराठी प्रतीतील काही संस्कृत अवतरणे आणि संस्कृत विवेकसिंधूच्या पोथीतील अवतरणे अभ्यासावी लागतात. विवेकसिंधूची मूळ पोथी चौदा अध्यायाची असून तिचा विस्तार अठरा प्रकरणातून झाला आहे हा विचार प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांनाही मान्य आहे. असे असूनही अठराव्या अध्यायातील

गुरुपरंपरेचा आणि पाशुपतहोमाचा बोध करून देणारी संस्कृत अवतरणे मात्र त्यांनी मूळविवेकसिंधूचा भाग असावीत असे प्रमाण म्हणून मान्य केलेले आहे (पान ३२) अठरा अध्यायातून ज्ञात होणारी माहिती आणि केवळ अठरा अध्यायातून प्रगट होणारी गुरुपरंपरा ज्याअर्थी संस्कृत विवेकसिंधूच्या पोथ्यांत आरंभापासूनच असते त्याअर्थी मराठी विवेकसिंधूच्या अठरा अध्यायी पोथ्या, हरनाथ, रामचंद्र, भारती यांच्या नाममुद्रांसहित प्रचारात आल्या-नंतरच संस्कृत विवेकसिंधूचे रूपांतर होत गेले असे दिसते. अमृतानुभवाचेही संस्कृत भाषांतर मराठी पोथी नंतर तयार झालेले आहे. पण संस्कृत विवेक-सिंधूच्या पोथ्या जर प्रथम जन्माला आल्या असतील तर मग आद्यमराठी कवी म्हणून मुकुंदराजांचे महत्व अनायासे कमी होते. विवेकसिंधूच्या पूर्वार्धाचे भाषांतर नरसिंहाकडून जयंतपाळाने करवून घेतलेले आहे हे स्पष्ट आहे. मूळ विवेकसिंधूची पोथी संस्कृतात होती हे मान्य आहे. पण अठराअध्यायी पोथीतील माहिती देणारी संस्कृतविवेकसिंधूची रचना मात्र मुकुंदराजांची नसून ती कुणा अनामिक अशा रचनाकाराची रूपांतरित रचना आहे असे म्हणावे लागते. अठरा अध्यायी मराठी विवेकसिंधूचे संस्कृत भाषांतर मुक्तिनाथ मुकुंदाने केलेले आहे असा बोध संस्कृत अवतरणावरून होतो. 'श्री रामनाम मुनींद्र चरणारविन्दमकरन्दस्वादमधुव्रतेन, निरस्ताखिलसंसार विकारेण श्रीमुक्तिनाथ मुकुंद मुनिना विरचितः परमार्थतत्त्वप्रबोधः सपूर्णः'। यावरून मुक्तिनाथ मुकुंद हा रामचंद्राचा शिष्य असून तो हरनाथांच्या शिष्यसंप्रदायातील होता. त्यांचा आणि मुकुंदराजांचा कोणताही संबंध नाही.

पूर्वार्धातील भाषांतरकाराचे म्हणजेच नरसिंहाचे कर्तृत्व त्याच अध्याया-पुरते आहे हे लक्षात घेतले म्हणजे 'आता म्हणो उत्तरार्ध। विवेकसिंधूचे प्रसिद्ध। सांगिजेल तरी सावध। करी अंतःकरण ॥ या ओवीचा कर्ता कुणी दुसरा आहे हे लक्षात येते. 'तेचि त्रिपदा महावाक्य। जेणे जीवेश्वराचे ऐक्य। तया पदत्रयाची व्याख्या। आता निरूपिजेल ॥' असे ज्यावेळी ओवीकार सांगतो त्यावेळी पूर्वार्धाचे मराठी भाषांतर पूर्ण झालेले होते आणि उत्तरार्धाच्या भाषांतराची गरज होती असे दिसते. उत्तरार्धाचे मराठी भाषांतर मुक्तिनाथ मुकुंदमुनीने केले असावे. किंवा त्याच्या कर्तृत्वात सुरेंद्रभारतीची भूमिका महत्वाची असावी.

छप्रत आणि हरनाथाचा काळ

छ प्रतीतील संस्कृत अवतरणावरून हरनाथाचा कालखंड ठरविता यावा अशी महत्वाची माहिती मिळते. छ पोथी १६७८ मधील असून या पोथीचे

हस्ताक्षर गोविंद नावाच्या पूर्णानंदाच्या शिष्याचे आहे. * त्याअर्थी १६७८ शकात गोविंदाचा काळ निर्धारित केल्यानंतर श्री आदिनाथ–हरनाथ–रघुनाथ–मुकुंदराज–नृसिहभारती–जगन्नाथ ( सहजरंग बोध– ) केशवस्वामी– पूर्णानंद अशी शिष्यपरंपरा त्यात अंतर्भूत आहे. प्रत्येक पिढीला २० ते २५ वर्षांचा कालखड दिल्या नंतरही शके १४५० चे आधीच्या काळखंडात हरनाथांना ओढता येत नाही आणि अन्य अप्रत्यक्ष प्रमाणाच्या आधारे हरनाथाचा हाच कालखंड ठरतो. एकूण विवेकसिंधूच्या अठरा अध्यायी मराठी पोथ्याची निर्मिती सुरेंद्रभारतीच्या काळात म्हणजेच अंदाजे शके १५०० चे सुमारास ठरविता येते. तात्पर्य कोणत्याच प्रमाणाच्या आधारावर विवेकसिंधूच्या मराठी पोथ्यांचा काळ शके १५०० चे आधी नेता येत नाही. त्याअर्थी मुकुंदराज हे आद्य मराठी कवी नव्हेत. रामचंद्राचे शिष्य मुक्तिनाथ मुकुंद आणि त्यांचे शिष्य नृसिहभारती, व आद्य मुकुंदराज, आणि त्यांचे शिष्य जयंतपाळ व त्या जयंतपाळाचे पितामह नृसिंह यांचा परस्परांशी मांसपिंडाने संबंध नाहीच. पण त्यांचे भौगोलिक क्षेत्रही एक नाही.

हरनाथांच्या शिष्यांची वेल विदर्भात पसरलेली आहे तिचे मराठवाड्याशी नाते नाही. आणि मुकुंदराज व जयंतपाळ यांचा इतिहास मराठवाड्यात घडलेला आहे त्याचेशी विदर्भाचा कोणताही संबंध नाही. विवेकसिंधूची पोथी मात्र वैदर्भियांना वंदनीय आहे. आणि वाङ्मयीन कलाकृतीचे महात्म्य हे प्रादेशिक अस्मितेने मान्य करावयाचे नसते. आणि तसेच जर निकष लावले तर विवेकसिंधूची पोथी साहित्यकृती म्हणून फारच निकृष्ठ दर्जाची आहे. उत्तम काव्याच्या कसोटीवर विवेकसिंधूचा कस उतरत नाही.

विवेकसिंधु हा एक तत्वज्ञानाचा ग्रंथ आहे. शांकर वेदान्त मराठीत समजावून सांगण्यासाठीच विवेकसिंधूच्या मराठी पोथीचे रूपांतर झाले आहे. शांकरभाष्याचा परिचय महाराष्ट्री प्राकृत परंपरेला विद्यारण्य स्वामींच्या कालखंडानंतर झालेला आहे असे दिसते. विशेष म्हणजे एकनाथांच्या आधीच्या कोणत्याच संतांनी कोणत्याच वेदान्ती आचार्यपरंपरेचा निर्देश केलेला नाही. ज्ञानदेव, नामदेव, या संतांच्या रचनेतून आचार्यांचे नाव अंतर्भूत नाही. 'आता वंदु शंकर' असे एकनाथ म्हणतात त्यावरून एकनाथाचे काळात नाथपंथीय तत्वज्ञानाला ओहटी लागून अद्वैतवेदान्ताचा प्रवेश महाराष्ट्रातील ब्राह्मणी मनोवृत्तीत झाला असे दिसते. एकनाथांचा नाथ भागवत पंथ आणि त्यांचे पुत्र

* गोविंदोपनाम्नचरणांकिकर श्री देवादिदेव पूर्णानंदात्मनेनमः

हरिपंत यांचा वेदान्ती मार्ग यांच्या जीवनमूल्यांत असणारा विरोध प्रसिद्ध आहे.

याच काळातही महानुभावियांच्या उपहासाचे पर्व मराठी संतांनी प्रारंभित केले असते. एकनाथ आणि तुकाराम दोघेही महानुभावांचा उपहास करतात. उपहासगर्भित टीकेपासून सुरक्षित राहावे यासाठी महानुभावी पंथाने पंधराव्या शतकापासून वेदान्ताचे मार्ग धरले आहेत. महानुभावी कवीश्वर आम्नाय हा वेदान्ती स्वरूपाचा आहे. महानुभावीयांना शांकराद्वैतात समाविष्ट करून घेण्याचा प्रयत्न दर्शविणारी पोथी या दृष्टीने विवेकसिंधूचे महत्व आहे आणि ही गरज देखील चौदाव्या शतकाची आहे. महानुभावी द्वैत आणि शांकराद्वैत यांचे सामंजस्य विवेकसिंधूचे पोथीत आढळते. आचार्यांनी शून्यवादाचे खंडन करण्यासाठी जसा अद्वैत पक्ष मांडला, पण वर्णव्यवस्थेच्या पीठावर जसा बुद्धाचा शून्यवादच प्रस्थापित केला; तद्वतच वर्णाश्रमधर्म त्याग करणाऱ्या महानुभावी तत्वज्ञानाला अद्वैत वेदान्तानुसारी बैठक देऊन, मुकुंदराजांनी महानुभाव आणि शांकराद्वैत यांचे अद्वैत प्रस्थापित करण्यासाठीच विवेकसिंधूची प्रकरणे रचली आहेत आणि चैतन्यवादी तत्वज्ञानाला मुकुंदराजाचे सारेच तत्वज्ञान सोयीचे न वाटल्यावरून सुरेंद्रभारतीसारख्या चैतन्यवादी पंथांच्या तत्वज्ञांनी विवेकसिंधूचा विस्तार केला. आचार्य जसे प्रच्छन्न बौद्ध आहेत तसेच मुकुंदराज प्रच्छन्न महानुभाव आहेत.

## विवेकसिंधूचे पुनर्मूल्यांकन-सारांश

महानुभावी आचाराला शांकराद्वैताची बैठक देण्यासाठी विवेकसिंधू निर्माण झाला आहे. या पोथीचे मुळात दोन स्वतंत्र भाग असून त्यांत चैतन्यतत्वाचे वस्तुनिष्ठ आणि आत्मनिष्ठ अनुभूतीतून शोध घेतले गेले होते. मुळांत ही पोथी संस्कृतात असून तिचे पूर्वार्धाचे मराठी भाषांतर नरसिंहाकडून जयंतपाळाने करवून घेतले. जयंतपाळ हा महानुभावी सामंत असावा. उत्तरार्धाचे भाषांतर मुकुंदमुनीने केले. हा मुकुंदमुनी हरिनाथांचा प्रशिष्य होता. मुकुंदराज आंबेजोगाईकडे उदयाला आले होते. आंबेजोगाईस त्याची समाधी आहे. जयंतपाळ तापीतीरावरील जैत्रगड येथील महाभावी सामंत असावा. कारण तेथे महानुभावीयांची मठी आहे. हरिनाथ आंभोऱ्यास समाधीस्थ झाले असावे. त्यामुळे

त्यांच्या शिष्य शाखा त्याच बाजूला पसरल्या आहेत. हरिनाथांच्या शिष्यपरंपरा आंबेजोगाईकडे आढळत नाहीत कारण त्यांचा आणि मुकुंदराजांचा संबंध आहे अशा भ्रामक कल्पनांनीच तो शोध घेण्यात येतो. मुकुंदराज वेदान्ती-पंथाचे होते. जयंतपाळ महानुभावी होता आणि हरिनाथ महानुभावी चैतन्यपंथाचे प्रवर्तक होते. विवेकसिंधूची पोथी हाच या त्रयीतील दुवा.

एकनाथ आणि नामदेवांनी मुकुंदराजांचा उल्लेख केला नाही. विवेक-सिंधूची पोथी १५७५ शकापूर्वीची उपलब्ध नाही. भाषेचा पोत एकनाथी वळणाचा आहे. त्यावर अमृतानुभावाची पुरेपूर छाया आहे. गुरुचरित्रातील काही ओव्यांशीही तिचे साम्य आहे. त्यामुळे कारण नसताना मुकुंदराजांना आद्यकवीचे स्थान देण्यात चूक झालेली आहे.



श्री. शरद पाटील

# कुलटा ते गणिका : ३ :

कुल व गोत्र हे शब्द प्राचीन भारतीय गणसमाजाचा मूलभूत घटक असलेल्या कुलाच्या * ( clan ) पर्यायवाची संज्ञामात्र होत्या असे काही म्हणतात. गोत्र ही मुळात निखालस ब्राह्मणी संस्था होती व नंतरच ती क्षत्रियांनी स्वीकारली, हे सनातन्यांचे प्रतिपादन ब्राह्मणी जातीयवादाची निपज आहे असा प्रतिवाद केला जातो. पण जेव्हा ते इरावती कर्वेसारख्या विख्यात व विज्ञाननिष्ठ समाजशास्त्रज्ञाकडून केले जाते, तेव्हा ते एकदम फेटाळण्याऐवजी त्याची दखल घेणे भाग पडते.

" क्षत्रियांना गोत्रे होती की नाहीत याबद्दल खूप लिहिले गेले आहे. वरील चर्चा स्पष्ट करते की क्षत्रियांना गोत्रे नव्हती. महाकाव्योत्तर काळात क्षत्रियांनी ब्राह्मणी गोत्राचे अनुकरण म्हणून जरी ती अंगिकारली तरी ती आडनावांना केवळ चिटकवल्यासारखीच राहिली व ब्राह्मणी गोत्राप्रमाणे कार्यक्षम होऊ शकली नाहीत. बुद्धाचे गोत्र गौतम होते असे सांगितले जाते. त्याचे कुटुंब इक्ष्वाकुवंशी होते. जनक त्याच वंशाची एक शाखा होते व बुद्धाचा अभिजन असलेल्या वर्तमान दक्षिण नेपाळवर राज्य करीत होते. जनकाचा पुरोहित शतानंद हा एक गौतम असल्याचे मानले जाते व म्हणूनच बुद्धाला गौतम म्हटले जात असे. अनेक क्षत्रियांनी आपल्या पुरोहितांची गोत्रे स्वीकारल्याचे सांगितले जाते. " १

पण इरावतीबाई कुलाचे ज्ञातीशी समीकरण करीत असल्यामुळे प्राचीन भारतीय समाजाचे मूलभूत घटक असलेल्या कुल व गोत्र या संस्थांच्या उत्पत्तीचे व विकासाचे सफल संशोधन करणे त्यांना शक्य झाले नाही.

' वंश व कुल या दोहोतही कुळाचे गुणधर्म नाहीत. वंश म्हणजे पितृपरंपरेचा सोपान. कुल म्हणजे वतनी भूमीशी निगडित भाऊबंदकी. जर

* या पुस्तकात कुल हा शब्द clan या अर्थी व कुळ हा शब्द कुटुंब या अर्थी वापरलेला आहे.

अनुक्रमणिका

कुळाची कनिष्ठ शाखा पृथक् होऊन दुसऱ्या ठिकाणी स्थायिक झाली व तिने आपले नाव बदलले, तर ते कुळ व मूळ कुळ यांच्यात सोयरीकसंबंध होऊ शके. कुळाचे नाव अपरिवर्तनीय असते. वंश व कुल यांची नावेमात्र परिवर्तनशील असतात. ती पितृनामे होती व प्रख्यात पूर्वजांपासून प्रचलित झाली होती. नवा वीरपुरुष उदयाला आला की त्याचे नाव तो आपल्या वंशजांना देई...

'कुलाला ज्ञाति, gebiuderschaft, म्हटले जाऊ शकते. ते जोपर्यंत वतनी भूमीशी निगडित राही तोपर्यंत ते विकुलविवाही ( exogamous ) राही....'[२]

म्हणून त्यांच्या मते या दोन्ही संस्था, त्यांची उत्पत्ती सोडली, तर समान धर्मी होत्या: म्हणजे दोन्ही पितृसत्ताक होत्या. पण कुलाचा अर्थ ज्ञाति असा केव्हा ना केव्हा तरी होत असल्याचा निर्णायक पुरावा आढळत नाही. कुल व गोत्र यातील भेदाचे अचूक आकलन होण्यासाठी आपल्याला प्राचीन साहित्याकडे वळले पाहिजे. हे साहित्य क्षत्रियांना व वैश्यांना स्वतःची गोत्रे नव्हती एवढेच सांगत नाही, तर त्यांना आपल्या पुरोहित ब्राह्मणांची गोत्रे स्वीकारावी लागत होती असेही सांगते—

'....ऐतरेय ब्राह्मणावरून असे दिसून येते की....धार्मिक विधीत जेथे प्रवराचे उच्चारण करायचे असे तेथे क्षत्रियांच्या बाबतीत त्यांच्या पुरोहिताच्या प्रवराचा पाठ केला जाई. यावरून असे अनुमान निघू शकते की त्या काळापर्यंत बहुतेक क्षत्रिय आपली गोत्रे व प्रवर विसरून गेले होते. श्रौत सूत्रे क्षत्रियांना ( आश्वलायन श्रौत सूत्राप्रमाणे राजांना ) एका पर्यायाची परवानगी देतात, 'त्यांनी आपल्या पुरोहिताचे प्रवर प्रयुक्त करावे वा सर्व क्षत्रियांनी एकाच प्रवराचा पाठ करावा-मानव-ऐल-पौरूरवस- इति.' मनुस्मृति ३.५ वर भाष्य करताना मेधातिथि म्हणतो की गोत्र व प्रवरांचे वर्गीकरण ब्राह्मणांपुरतेच मर्यादित असून क्षत्रियांना व वैश्यांना ते लागू नाही, व यासाठी तो आश्वलायन श्रौत सूत्राचा ( १.३ ) आधार देतो. मिताक्षरा व निबंधकार हे या सूत्रानी उल्लेखलेल्या पहिल्या पर्यायावर विसंबतात व सांगतात की क्षत्रिय व वैश्य यांच्या विवाहामध्ये त्यांच्या पुरोहितांची गोत्रे व प्रवरच आधारभूत धरली पाहिजेत; कारण त्यांना स्वत.ची अशी विशिष्ट गोत्रे नसतात...'[३]

गोत्रांच्या विधिपूर्वक उच्चारणाचे प्रयोजन क्षत्रिय व वैश्य दोन्हींच्या बाबतीत विवाहसमारंभाच्या वेळी येई, तर क्षत्रियाच्या बाबतीत ते राज्या-

भिषेकाच्या वेळी येई. क्षत्रियांना विहित पर्यायातल्या एका नावाची निःसंदिग्ध मातृवंशीयता वैशिष्ट्यपूर्ण आहे. रामायण ( ७.८९.२३–२४ ) सांगते की ऐल हा बाल्हीकांची राणी इला इचा मुलगा होता, तर महाभारत (१.२५.१८-१९) म्हणते की इला ही पुरूरवसची पिता व माता दोन्ही होती ( सा वै तस्य अभवन् माता पिता च एव इति ना श्रुतम् । ).[४] या पर्यायी गोत्रव्यवस्थेतली पितृवंशीयता पुरूरवस्पासूनच सुरू होते. स्मृतिकारांनी ब्राह्मणांकरता व बाकीच्या दोन्ही वरिष्ठ वर्णीयांकरता वेगवेगळ्या प्रकारच्या विवाहविधीच्या शिफारसी केलेल्या आहेत व त्यांची निष्पत्ती दोन्ही प्रकारच्या वर्णांच्या वधूच्या बाबतीत वेगवेगळी होई. बौधायन म्हणतो की ब्राह्मणांकरता ( १ ) ब्राह्म, ( २ ) प्राजापत्य, ( ३ ) आर्ष, व ( ४ ) दैव हे विवताहविधी वैध आहेत, क्षत्रियांकरता आसुर व राक्षस, आणि वैश्य व शूद्र यांच्याकरता अनुक्रमे गांधर्व व पैशाच.[५] विवाहविधींचे मुख्य वर्गीकरण ब्राह्मणांकरता पहिले चार विधी व बाकी वर्णाकरता अवशिष्ट चार विधी हेच आहे. पहिल्या चार विधींपैकी कोणत्याही एका विधीप्रमाणे लग्न झालेली वधू पतीच्या गोत्रात जाते, तर बाकी चार विधींपैकी कोणत्याही एका विधीप्रमाणे लग्न झालेली वधू पित्याच्याच गोत्रात राहाते हा निबंधकारांचा शेरा अर्थपूर्ण आहे—

' मामेबहिणीशी विवाहाचा निषेध करणाऱ्या स्मृतिवचनाचा खुलासा स्मृतिचंद्रिका व पराशरमाधवी यांनी वैशिष्ट्यपूर्ण रीतीने केला आहे. जेव्हा एखादी स्त्री ब्राह्म, इ० चार प्रकारच्या विधीपैकी कोणत्याही एका विधीने विवाहबद्ध होते तेव्हा ती पतीच्या गोत्रात जाऊन त्याच्या कुटुंबाची सपिंड होते व म्हणून तिचे तिच्या पित्याच्या कुटुंबाशी ( गोत्र व सपिंड संबंधांच्या दृष्टीने ) असलेले नाते तुटते; पण जर एखाद्या स्त्रीने आसुर, गांधर्व, इ० चार प्रकारे विवाह केला तर ती तिच्या पित्याच्याच गोत्रात राहते आणि तिच्या पित्याशी व मातेशी तिचे सपिंड संबंध अबाधित राहतात. म्हणून अशा स्त्रीच्या मुलाने जर आपल्या मामाच्या मुलीशी लग्न केले तर त्याचा अर्थ त्याने आईच्या सगोत्र व सपिंड मुलीशी लग्न केले असा होईल. स्मृतिचंद्रिका, पराशर माधवी, इ० निबंधकार म्हणतात की स्मृतींनी मामेबहिणीशी विवाहाला केलेली मनाई गांधर्व, आसुर, इ. चार प्रकारांनी ज्याच्या आईचे लग्न झालेले होते त्याला उद्देशून आहे, पण ब्राह्म, इ. चार प्रशंसित प्रकारांनी ज्याच्या आईचे लग्न झालेले होते त्याला उद्देशून नाही ···[६].

मामेबहिणीशी विवाहाबाबत मनाई व परवानगी यांच्याबद्दल केलेला हा खुलासा नकळत कबूल करतो की गोत्रव्यवस्था पाळणारे ब्राह्मण पितृसत्ताक होते, तर बाकी वर्ण मातृवंशीय होते. क्षत्रिय व वैश्य यांना विहित असलेले विवाहपर्याय स्पष्टपणे एवढेच दाखवत नाही ही गोत्रव्यवस्था त्यांना पूर्णपणे परकी होती, पण हेही सुचवते की ते मातृवंशी कुलप्रथाक होते. कारण हे खालचे तीन वर्ण कुलव्यवस्थाविहीन होते असे समजणे हास्यास्पद आहे. पाणिनीच्या ४.१.१४७ या सूत्राचे विवरण वासुदेव शरण अग्रवाल खालीलपणे करतात–

'... पाणिनीच्या मते मातृगोत्रीय नाव कुत्सास्पद असते (४.१.१४७); कारण असे समजले जात होते की पित्याचे नाव अज्ञात असल्यानंतरच आईवरून नाव ठेवले जाते ( काशिका, पितुर-असंविज्ञाने मात्रा व्यपदेशोऽपत्यस्य कुत्सा । ) ...'[७].

पण आईच्या गोत्रावरून ओळखले जाणे हे कुत्सास्पद होते हा खुलासा खुद्द पाणिनि मातृनामाने ओळखला जात होता या वस्तुस्थितीशी मेळ खात नाही–

'... पाणिनीचे त्यांच्या मातेच्या दक्षगोत्रीय नावावरून दाक्षीपुत्र ( दाक्षीपुत्रस्य पाणिनेः । १.७५ ) असे वर्णन करणारी एक कारिका पतञ्जलि उद्धृत करतो. दाक्षेय हेही पाणिनीचे मातृनामच असू शकते ...'[८]

वासुदेव शरण अग्रवाल यांच्या मते मातृगोत्राच्या नावे संबोधायच्या बाजूने लोकमताचा कल पतञ्जलीच्या काळात ( खिस्तपूर्व दुसरे शतक ) फिरला–

'... पण नंतर बदल घडून आला असावा असे दिसते. पतञ्जलि म्हणतो की आईच्या नावाने संबोधले जाणे हे प्रतिष्ठितपणाचे मानले जाते; उदाहरणार्थ गार्गीमात, वात्सीमात ( भाष्य, ७.३.१०७;३.१४० मातृणां मातच् पुत्रार्थम् अर्हते । ).'[९]

पण आईच्या नावाने वा गोत्राने संबोधले जाणे गौरवाचे मानण्याची प्रथा निदान प्राचीनतम औपनिषदीय काळाइतकी तरी मागे जाते. बृहदारण्यक उपनिषद्ने ( ६.५.४ ) नमूद केलेले वाजसनेयि वंशाचे सर्व आचार्य मातृनामी आहेत व शंकराचार्य भाष्य करतात की स्त्री-प्राधान्यातून गुणवान् पुत्र संभवतात ( स्त्री-प्राधान्यात् गुणवान् पुत्रो भवति । ).

तसेच आपल्याला असे दिसून येते की पाणिनी ज्या गाव व गणाचा ( संघाचा ) होता त्यांची नावे अनुक्रमे 'दाक्षि-कूल' व 'दाक्ष-सङ्घ'

अशी होती.[१०] पाणिनीच्या ६.२.१२९ या सूत्रानुसार कूलचा अर्थ गाव असा होतो.[११] कूलचा अर्थ नदीचा किनारा असाही होतो. निरुक्त ( ९.२६ ) कूलचा उच्चार कुल असाही करते, ज्याचा अर्थ कुल ( clan ) होता. ३.५३.१४ या ऋचेने उल्लेखलेल्या प्रमगन्द या अनार्य कीकटांच्या राजाचे वर्णन निरुक्त ( ६.३२ ) 'अत्यन्त–कुसीदी–कुलीन:' असे करते. यास्काचार्यांनी त्याचा 'बड्या सावकारांच्या कुटुंबात जन्मलेला' असा चुकीचा अर्थ लावलेला आहे.[१२] पण तैत्तिरीय संहितेप्रमाणे ( ३.३.८३ ) कुसीदिन्चा अर्थ 'भूमातेचा भक्त' असा होतो; कारण तेथे यमीचे कुसीदम् वा पृथ्वी असे स्तवन केले आहे. म्हणून, 'अत्यन्त- कुसीदि – कुलीन:' चा अर्थ 'पवित्रतम भूभक्तकुळात जन्मलेला' असाच केला पाहिजे. या निरुक्तीला 'तिरु – वंचिक् – कुलम्' च्या अर्थाने पुष्टी मिळते. ही प्राचीन चेर (केरळ) राज्याची राजधानी होती व ती वर्तमान कॅननूरजवळ वसलेली होती. पद्मनाभ मेनन सांगतात की तिरूचा अर्थ संपन्न असा होतो व वंचि हे देशाचे नाव होते ( पाणिनीच्या ४. १. १६८ या सूत्रानुसार ते बहुधा त्या नावाच्या क्षत्रिय कुलावरून पडले असावे. ) कुलम् हे राज्यकर्त्या कुलाच्या निवासस्थनाचा निर्देश करते हे उघड आहे.[१३]

गोत्राचा शब्दश: अर्थ गाईंचा वाडा असल्याने तो पशुपालकतेचा सूचक आहे असा खुलासा अगोदर केलेलाच आहे. स्मृतिकार बौधायन सांगतो की वेदाध्ययन हा ब्राह्मणांचा वर्णधर्म व शेती हा वैश्यांचा वर्णधर्म हे परस्परविरोधी आहेत, आणि धर्मशास्त्रे एका आवाजात सांगतात की वरिष्ठ दोन वर्णांनी शेतीचा अवलंब केवळ आपत्कालातच करावा.[१४]

या उलट कुलाचा शेतीशी व तिच्या तंत्र या जादूच्या तंत्राशी ( माया-विधीशी ) अविभाज्य संबंध होता. निरुक्त ( ६.२२ ) कुलची व्युत्पत्ती पुढील प्रमाणे देते– '... ... कुल ( कुटुंब ) हा शब्द कुष ( या धातू )पासून निघाला आहे. त्याचा अर्थ मळणे (तिबणे) असा होतो.'[१५] कुलाची तुलना येथे मळलेल्या वा कसलेल्या जमिनीशी केलेली आहे वितनस्ता नदीच्या 'महा–कूला' या विशेषणाचे निरुक्तप्रणीत ( ९.२६ ) विवरण महान् वा कराडीचे काठ असलेली असे आहे.[१६] कूलचा उच्चार येथे कुल असाही केला आहे. म्हणून, महा – कूल या समासाचा अर्थ कसलेल्या जमिनीचे 'कराल'* किनारे असलेली नदी असा व्हायला पाहिजे. पाणिनीच्या ७-३-१ या सूत्रावर भाष्य करताना पतञ्जलि

* मातृदेवता दुर्गेचे एक विशेषण 'कराला' असे आहे.

अनुक्रमणिका

माहिती पुरवतो की देविका नदीच्या किनाऱ्यांवर भात पिकवला जात असे ( देविका–कूलाः शालयः । ). राम शरण शर्मा टिपणी करतात –

'शेतीला कृत्रिमरीत्या पाणीपुरवठा करणाऱ्या साधनांच्या तौलनिक अपुरेपणामुळे आपली जमीन पावसाळ्यात पुराच्या पाण्याने भिजवण्यावरच शेतकऱ्यांची मुख्य मदार होती. याची सूचना आपल्याला व्याकरणातील एका उदाहरणावरून मिळते. हे उदाहरण आपल्याला माहिती पुरवते की देविका नदीचे काठ साळीचे पीक घ्यायला अत्यंत सोयिस्कर होते...... '

पाणिनीच्या १–१–२४ या सूत्रावर भाष्य करताना पतञ्जलि साळीच्या शेतांना पाणी देणाऱ्या कालव्यांचा 'कुल्य' म्हणून निर्देश करतो ( शाल्यर्थं कुल्याः प्रणीयन्ते । ).[१८] पालीत कालव्याला एक वैशिष्ट्यपूर्णशब्द आहे– मातिका. बुद्ध कालव्यांनी संपन्न अशा शेतांचा उल्लेख करतो ( ...खेत्तं... मातिका–सम्पन्नं होति ... ... । ).[१९] भाष्यकार बुद्धघोष मातिकेची 'माता' अशी व्याख्या करतो ( मातिका 'ति मातरो जनेत्तियो 'त्ति अत्थो । ). प्राचीन बौद्ध तत्त्वज्ञान या शब्दाचा कारण वा हेतु परिणाम वा कार्याची माता, या अर्थी उपयोग करते.[२०] कुल्याचे अर्थ खळ्यात उडवायची वा उपनावाची टोपली व ८ द्रोण वा १६ मणाएवढे धान्याचे माप असेही होतात.[२१]

मनु ( ७–११९ ) आदेश देतो की राजाने दहा व वीस गावांवरील अधिकाऱ्यांना वेतनादाखल एक व पाच कुले जमीन द्यावी. जॉर्ज बुहलर कुल–जमीन म्हणजे किती क्षेत्र याविषयी टीकाकारांचे वेगवेगळे अंदाज खालीलप्रमाणे देतो–

'कुलम्, ' ( एका कुटुंबाला पुरेल एवढी जमीन ) कुटुंब,' या पारिभाषिक शब्दाचा अर्थ मेधातिथि घंट, काली जिल्ह्यात परिचित असलेली संज्ञा, असा लावतो. गोविंदराज, कुल्लूक भट्ट नारायण व राघवानंद हे ती जमीन मध्यम हलाच्या दुप्पट म्हणजे बारा बैलांनी कसली जाऊ शकेल एवढी, असल्याचे सांगतात, तर नंदनाचार्य ती ' एका शेतकऱ्याच्या भागाएवढी ' असल्याचे सांगतो.'[२२]

वासुदेव शरण अग्रवालना वाटते की कुल म्हणजे दोन औतांची जमीन असावी––

'...मनु कुल नावाच्या दोन औतांच्या जमिनी एवढ्या जमिनीच्या मापाचा निर्देश करतो . . ती दोहलिका अग्रहारांएवढीच असावी.'[२३]

कुल म्हणजे चौदा एकर या एस्० के० मैतींच्या निष्कर्षाशी रामशरण शर्मा सहमत होतात.[२४] मनूच्या टीकाकारांप्रमाणे आधुनिक विद्वानही कुलचा

अर्थ ( एकत्र ) कुटुंब असा घेतात व कुल जमिनीचा अर्थ ( एकत्र ) कुटुंबाला पुरेल एवढी जमीन असा लावतात. हा अर्थ जरी आपण मान्य केला, तरी दहा गावांवरचा अधिकारी चौदा एकरांइतकी तुटपुंजी जमीन मिळवण्याची अपेक्षा धरील व तीवर संतुष्ट राहील असे समजणे हास्यास्पद आहे. डी. सी. सरकार यांचे या प्रश्नावरील संशोधन सर्वांगपरिपूर्ण असल्याचे जरी मैती मान्य करतात, तरी ते सरकारांचा याबाबतचा निष्कर्षमात्र अमान्य करतात. मैती सरकारांचा निष्कर्ष खालीलप्रमाणे सारूपाने मांडतात--

'आधुनिक बंगालच्या बऱ्याच भागांमध्ये भाताच्या रोपाची लावणी करतात. गुप्त काळात असेच घडत होते असे कालिदास रघुवंशात दाखवतो. म्हणून सरकार असे गृहीत धरतात की कुल्यवापाचे क्षेत्र म्हणजे एक कुल्य साळीच्या रोपाची लावणी करायला लागणारी जमीन. फरीदपूर जिल्ह्यात, सर्वात महत्त्वाचे ताम्रपट उपलब्ध झाले तेथून विशेष दूर नसलेल्या ठिकाणी, एक मण साळ पेरायला ३ बिघे जमीन लागते, तर तेवढ्या रोपाच्या लावणीला १० बिघे जमीन लागते. अशा प्रकारे एक कुल्य बीच्या रोपाची लावणी करायला १२८ ते १६० बिघे जमीन लागेल . . .[२५]

दहा गावांचा अधिपती मध्ययुगीन महाराष्ट्राच्या देसाई वा देशमुखाच्या दर्जाचा होता. त्याचे कुळ ज्या गावाचे वतनदार असे त्या गावचा पाटील म्हणून तो वतनी इनाम नावाची जमीन उपभोगीत असे. ही जमीन क्षेत्राने एक चाहूर असे.[२६] जदुनाथ सरकार सांगतात की एक चाहूर म्हणजे १२० बिघे.[२७] म्हणून एक कुल जमीन म्हणजे १२० ते १६० बिघे क्षेत्र हाच कुलाचा अर्थ असू शकतो. बागाइती जमिनीचे एवढे क्षेत्र एक कुल खेडीत असे.

कुरू देशात गाराच्या वृष्टीमुळे पडलेल्या दुष्काळाच्या संदर्भात कुल्--माष हा शब्द छांदोग्य उपनिषद्मध्ये (१-१०-२) येतो, शंकराचार्य त्याचे निरूपण ' टाकाऊ डाळ ' ( कुत्सितान् माषान् ) असे करतात. कुल-त्थ वा कुळीद हे महाराष्ट्रात सर्वात निकृष्ट दर्जाचे कडधान्य समजले जाते. त्याचा खाण्यासाठी उपयोग केवळ दुष्काळातच होत असे व चांगल्या वर्षी गुरांचे दाण म्हणून. कुल्-माषची व्युत्पत्ती निरुक्त ( १.४ ) याच संदर्भात देते- ' ...... कुल्-माषः ( आंबलेली घाटाघुगरी ) † असे म्हणण्याचे कारण ते कुटुंबात ( कुलेषु ) वाया जातात ( सीदन्ति ) ...... '[२८] पण औपनिषदीय

† दुष्काळात वा दारिद्र्यात अजूनही- " घाटा-घुगरी खाऊन दिवस काढले, " असे म्हणतात. घाटा म्हणजे कांजी.

काळात अजून जमिनीची खाजगी मालमत्ता नसल्याने 'कुटुंबे' असणे शक्य नव्हते. म्हणून, कुल्-माचा अर्थ 'कुलात वाया जाणारे टाकाऊ कडधान्य' असाच घेतला जाऊ शकतो.

शेतीच्या मायाविधी असलेल्या तंत्रात कुलचा अर्थ स्त्री असा होतो.[२९] चट्टोपाध्याय कृषि-मायेची व्याख्या खालीलप्रमाणे करतात.

'भूमातेची-निसर्गाची-उत्पादनक्षमता मानवी प्रजोत्पादनकृत्याच्या संसर्गातून वा नकलेतून कार्यान्वित करणे वा वाढवणे या तत्त्वावर कृषि-माया आधारलेली आहे. याउलट मानवी सुपीकता (fertility) नैसर्गिक सुपीकते-वर अवलंबून असल्याचे मानले जाते.'[३०]

ब्रिफॉल्टने निःसंदिग्धपणे सिद्ध केले आहे की जगभर शेती हा स्त्रियांचा शोध आहे.

'... ... कृषीची कला केवळ स्त्रियांच्याच हातून विकसित झालेली आहे.'[३१]

म्हणूनच सीता-यज्ञ हा वैदिक कृषि-मायेचा विधी, आळतेकरांच्या म्हणण्याप्रमाणे, केवळ स्त्रियांचाच सण होता-

'असे काही यज्ञ होते की जे खिस्तपूर्व ५०० पर्यंत केवळ स्त्रियाच करू शकत. भरघोस हंगामाचे फळ मिळवण्याच्या हेतूने केला जाणारा सीता-यज्ञ हा त्यातला एक होता ... या यज्ञाशी केवळ स्त्रियांचाच संबंध असायचे कारण त्यांची उद्दिष्टे भरघोस हंगाम व सुपीकता ही असल्याने त्यांची साक्षात् प्रतीके असलेल्या स्त्रियांनीच ते संपन्न केले पाहिजेत ही मीमांसा त्यामागे असणे शक्य आहे.'[३२]

कौटल्य (२,४०) आदेश देतो की वैदिक कृषिदेवता सीता इचे स्तवन केल्यानंतरच पेरणीला प्रारंभ केला पाहिजे.[३३]

अथर्ववेदाचे १.१४ हे सूक्त 'कुल-पा' कन्येच्या विरुद्ध एक माया-मंत्र (अभिचार) आहे असे समजले जाते. व्हिटने हा कुल-पाचा अनुवाद गृहिणी वा गृहपाली (housekeeper) असा करतो, तर ७.७२.२ या ऋचेतल्या याच शब्दाचा अर्थ तो कुटुंबप्रमुख असा करतो.[३४] अथर्ववेदीय सूक्त व ८.८०, १०.३९,४० ही ऋग्वेदीय सूक्ते यात आलेल्या या शब्दाचा सर्वमान्य अर्थ वृद्धकुमारी वा पित्याचे घर चालवावे लागून तेथेच वृद्ध झालेली-अविवाहिता स्त्री, असा घेतला जातो. पण त्याचा शब्दशः अर्थ कुलाचे पालन वा आधिपत्य करणारी स्त्री असाच होतो. अथर्ववेदीय ऋचा १.१४.२ व ३ खालीलप्रमाणे आहेत-

एषा ते राजन् कन्या वधूर् निर्धूयतां यम ।
सा मातुर् बध्यतां गृहेऽथो भ्रातुर् अथो पितुः ॥

[ या कन्येच्या अंगात आलेल्या ( सोम ) राजा,* ( या तुझ्या) वधूशी संभोग कर ! तिला तिच्या मातेच्या, बंधूच्या व पित्याच्या घराशी जखडून ठेव ! ]

एषा ते कुल-पा राजन् , तान् उ ते परि दद्मसि ।
ज्योक् पितृष्व् आसाता आ शीर्ष्णः समीप्यत् ॥

[ राजन् ती तुझ्या कुलाची मुख्या आहे; आम्ही तिला तुझ्या हवाली करतो. ती तिच्या पित्याकडे† दीर्घ काळपर्यंत राहो व त्यांची मस्तके ( केसांनी वा पिकांनी ) पेरली जावो ! ].

डोके कुल-जमिनीसारखेच मानले जात होते हे अपाला आत्रेयी या कुलपेने ८.९१.५ या ऋचेद्वारे केलेल्या इंद्रस्तवनात स्पष्ट होते–

"इमानि त्रीणि विष्टपा तानि इन्द्र विरोहय ।
शिरस् ततस्य उर्वराम् आदिदं मे उप उदरे ॥"

[ "इंद्रा, मी उद्घोषित करते त्या या तीन जागा पुन्हा अंकुरित होऊ दे– माझ्या पित्याचे डोके, त्याचे सुपीक शेत व माझे ओटीपोट ! " ].

याचा अर्थ असा होतो की स्त्री ही कुलाची मुख्य होती, जी कुलाची पुरोहिता या नात्याने कुल-जमिनीची सुपीकता व उत्पादकता संवर्धित करण्यासाठी कृषि-मायेचे विधी करी. स्मृतिकारांना ही कुलपा ब्रह्म-वादिनी या नावाने परिचित होती.

'... स्मृतिचंद्रिका, इ. सारसंग्रहांनी उद्धृत केलेले हारीत-धर्मसूत्र म्हणते, 'दोन प्रकारच्या स्त्रिया असतात; पहिला प्रकार ब्रह्मवादिनींचा ( म्हणजे दैव-वेदाच्या, विद्यार्थिनी ) व दुसरा प्रकार सद्योवधूंचा (म्हणजे ज्या लगेच लग्न करतात ). यापैकी ब्रह्मवादिनींना उपनयन, अग्निचयन, वेदाध्ययन व स्वतःच्या घरात ( म्हणजे मातापित्याच्या घरात ) भिक्षाटन, यातून जावे लागते; ... '.[३६]

पाणिनीकडून व्याकरणाच्या सूत्रांचा संग्रह व्हायच्या काळापर्यंत ही कुल-पा तिरस्कृत व पतित स्त्रीत परावर्तित होते. कारण पाणिनीच्या

* सोम हा मुळात गंधर्व होता. 'अंगात येणाऱ्या' बाईला 'गंधर्व-गृहीता' म्हणत.

† प्राचीन काळात चुलत्याला 'पिता'च म्हणत.

४.१.१२७ या सूत्रात कुलटाचा अर्थ दुराचारी स्त्री असा होतो. आपल्या उत्तुंग स्थानावरून तिचा हा अधःपात कसा झाला? काशिका उत्तरते की या कुलाकडून त्या कुलाकडे असे भिक्षाटन करण्यात ती शीलभ्रष्ट होते ( या तु कुलान्य अटन्ती शीलं भिनत्ति ... । ). पण भव्य गतकाळ पूर्णपणे पुसला जात नाही. भट्टोजी भाष्य करतात की या कुलाकडून त्या कुलाकडे असे भिक्षाटन करणारी ही कुलटा भिक्षुकी व सतीही होती ( सती भिक्षुवय अत्र कुन्-टा ).[३७] बौद्ध भिक्षु संघात आपल्याला अशी भिक्षुणी, पण एकाच कुलात भिक्षाटन करणारी आढळते. ज्या बौद्ध भिक्षुणीला आपली निर्धारित भिक्षा एकाच कुलाकडून मिळे व अनेक कुलांकडे जायची गरज नसे तिला कुलूपिका असे म्हणत. भिक्षुणी थुल्लनन्दा अशा प्रकारची भिक्षुकी होती ( तेन खो पन समयेन थुल्लनन्दा भिक्खुनी अञ्ञतरस्स कुलस्स कुलूपिका होति निच्चभत्तिका । ).[३८]

कुल-टा हा समास काशिकेने असा सोडवला आहे– कुलान्य् अटति इति कुल–टा। म्हणजे जी या कुलाकडून त्या कुलाकडे ( भिक्षेसाठी ) परिभ्रमण करते ही शब्दनिर्मितीच दाखवते की या क्रियेतून कुल-माता ज्ञाति–मातेत परिणत झालेली आहे.

बुद्धाची एक आवडती रूपककथा जनपद–कल्याणीची होती.[३९] ही कथा आपल्याला सांगते की जनपद कल्याणी जेव्हा नृत्य व गायनाचा सार्वजनिक कार्यक्रम करी तेव्हा तो पाहायला प्रचंड गर्दी जमे ( सा खो पनस्स जनपद–कल्याणी परम–पासाविनी नच्चे, परम–पासाविनी गीते, जनपद–कल्याणी नच्चती गायती' ति खो, भिक्खवे, भिय्योसोमत्ताय महाजन–काय सन्निपतेय्य । )[४०] ऱ्हाइस डेव्हिड्स् या शब्दाचा अर्थ 'देशातली सर्वात सुंदर स्त्री' असा लावतात.[४१] राहुल सांकृत्यायनही 'देशाची सुंदरतम स्त्री' असा अनुवाद करतात,[४२] तर जगदीश काश्यप धर्मरक्षित 'वेश्या' असा अर्थ काढतात.[४३] पण या शब्दाचा शब्दशः अर्थ होतो 'जनपदाच्या कल्याणाचे कारण असणारी स्त्री.'

जन-पद या समासाचा काटेकोर अर्थ 'ज्ञातीचा (जनाचा) देश' असा होतो. म्हणून जनपद–कल्याणी ही गणाची नसून ज्ञातीची होती. ब्रह्माशी एकरूप होण्याच्या ( ब्रह्म–सहव्यता ) ब्राह्मणी सिद्धांताचे खंडन करण्यासाठी वासट्ठ ब्राह्मणाशी चर्चा करताना बुद्धाने जनपद–कल्याणीचे रूपक वापरले होते —

"जसे, वासेट्ठ ! एखादा माणूस असे म्हणतो– 'या देशाची जी जनपद-कल्याणी आहे तिची मी इच्छा धरतो, कामना करतो.' त्याला (लोक) असे विचारतात– '(भल्या) माणसा, तू ज्या जनपद–कल्याणीची इच्छा धरतोस, कामना करतोस, ती क्षत्रियाणी (खत्तियी) आहे, की ब्राह्मणी आहे, की वैश्या (वेस्सी) आहे, की शूद्रा (सुद्दी) आहे? असे विचारल्यावर तो– 'नाही,' असे म्हणतो.

'तेव्हा ते त्याला असे विचारतात- '(भल्या) माणसा, तू ज्या जन-पद-कल्याणीची इच्छा धरतोस, कामना करतोस, ती अमुक नावाची, अमुक गोत्राची आहे का, उंच वा बुट्टी व मध्यम उंचीची आहे का, काळी वा श्यामा वा निमगोरी आहे का, या गावात वा निगमात वा नगरात राहाणारी आहे का, असे विचारल्यावर तो– 'नाही,' असे म्हणतो." [४४]

पाणिनीचे ४.१.१६८. हे सूत्र सांगते की देशाचे नाव त्या देशात राहणाऱ्या क्षत्रियांवरून पडते. जरी क्षत्रिय हे गणात वा गणसङ्घात राहात असत, तरी ते त्या सङ्घगणांतले एक जाति वा ज्ञातिमात्र होते. ते मातृसत्ताक वा मातृवंशी कुलव्यवस्थेत राहात हे अगोदरच सिद्ध केलेले आहे. म्हणून, त्या गणाचे नाव त्या गणातल्या क्षत्रिय ज्ञातीच्या संस्थापिकेवरून पडत असे. पाणिनीचा संघ त्यांचे एक उदाहरण आहे–

'दाक्षांचा निर्देश संघात संघटित झालेले कुल म्हणून येतो हे काशिकेतील खालील उदाहरणांवरून दिसून येते: दाक्षः संघः, दाक्षः अङ्कः, दाक्षं लक्षणम् (४.३.१२७) ...' [४५]

ऋचा + १०.८६.२३ म्हणते की पर्शु नावाच्या स्त्रीने वीस संतानांना जन्म दिला (पर्शुः ह नाम मानवी साकं ससूव विंशतिम्।). पाणिनीचे ५.३.११७ हे सूत्र सांगते की पर्शु हे एका देशाचे नाव होते व पार्शव त्यात राहाणाऱ्या क्षत्रियांचे. तोच नियम पुढे सांगतो की यौधेयांचा संघ व त्यांचा देश यांची नावे संघजननी युधा इच्यावरून पडली. तथाकथित दैवी गणाच्या पाच जनांच्या संस्थापिका पाच 'जनी' होत्या, आणि शाल्व व मद्र या ज्ञाती भद्रा काक्षीवतीपासून जन्मलेल्या होत्या. अशी अनेक उदाहरणे देता येतील.

अदितीचे स्तवन करणाऱ्या ७.६.१ या अथर्ववेदीय ऋचेत–जी पंच जनाच्या दैवी गणात केवळ एक 'जनी' होती–तिचे आता सर्व जनाची व अखिल विश्वाची जनी म्हणून स्तवन केले जाते.

+ केवळ 'ऋचा' असे म्हटले असेल तेथे ती ऋग्वेदीय समजावी.

अदितिर् द्यौर् अदितिर् अन्तरिक्षम् अदितिर् माता स पिता स पुत्रः।
विश्वे–देव अदितिः पञ्च–जना अदितिर् जातम् अदितिर् जनि त्वम् ॥

[ अदिति स्वर्ग ( आहे ), अदिति अंतरिक्ष, अदिति माता, ती पिता, ती पुत्र; विश्वे–देवांचा ( जन ) अदिति ( आहे ), पाच जन अदिति आहेत; जन्माला आलेले सर्व अदिति ( आहेत ); जनी ! तू ( सर्व विश्वाची माता बनलेली आहेस. ). ]

येथे ज्ञाति–मातेचा कालानुक्रमात गण–मातेत तसेच प्रकृतीप्रमाणे विश्व–मातेत कायाकल्प झाल्याचे स्पष्ट उदाहरण आपल्याला मिळते.

मानवी गण–मातेची भेट आपल्याला गणिकेच्या स्वरूपात होते. काम–सूत्र ९.५.२८ मधील गणिकेची 'उत्तम श्रेणीची वेश्या, अशी व्याख्या यशोधर करतो ( त्रिविधा वेश्या–गणिका, रूप–आजीवा, कुम्भ–दासी च । ताः प्रत्येकम् उत्तम–मध्यम–अधम–भेदात् त्रिविधः । ) . एक प्राचीनतम व सर्वात विख्यात होती वज्जि गणसंघाची अम्ब–पाली.

जैनाच्या कल्प–सूत्रानुसार लिच्छवि ( = वज्जि ) गण नऊ ज्ञातींचा बनलेला होता व त्याने तशाच नऊ ज्ञातींचा बनलेल्या मल्लकि गणाशी एकजूट करून कासी–कोसल नावाचा गणसंघ बनवला होता . ( ...... नव मल्लुई नव लेच्छई कासी–कोसलगा अट्ठरसवि गण–रायाणो .... । ). [४७] गणाच्या विविध घटकांच्या संज्ञा वापरण्यात प्राचीन भारतीय वाङ्मय विशेष काटेकोर-पणा दाखवीत नाही. विशिष्ट संज्ञेचा अर्थ तिच्या संदर्भावरूनच समजून घ्यावा लागतो. महावीर व बुद्ध यांच्या काळात मल्लांचे स्वतंत्र गणराज्य होते; म्हणून कल्प–सूत्राने योजलेला गण शब्द ज्ञाति या अर्थीच घेतला पाहिजे. राहुल सांकृत्यायन यांच्या मते वज्जि गण आठ जनांचा बनलेला होता व त्यात विदेह व लिच्छवि हे विशेष प्रख्यात होते.[४८] व्याकरणसाहित्यातील माहितीच्या आधारे बी. एन् . पुरी लिहितात–

'अगोदरच्या काळात वृजि हा उत्तर बिहारमधील विद्यमान् मुजफ्फरपुर व दरभंगा जिल्ह्यांनी बनलेला देश होता व त्यात वैशालीचे लिच्छवि व विदेहाचे जनक राहात होते. [ ६.२.४२ ]. कुरुप्रमाणे वृजींचेही कुटुंबांचे राज्य होते ( कुरु गार्हपतम् । वृजि गार्हपतम् । ), पण विदेहांचा उल्लेख मात्र क्षत्रियांच्या यादीत येतो.'[४९]

रामायण निःसंदिग्धपणे सांगते की विदेहांच्या सीमेवरच्या व गंगा नदीच्या उत्तर तीरावर वसलेल्या देशावर वैशालिक राजे राज्य करीत होते

( १.४५-४७ ). अशा प्रकारे विदेह व वैशालिक ही रामायणकालात वेगवेगळी व स्वतंत्र राज्ये होती असे दिसून येईल. बुद्धाचा समकालीन असलेला मगधाचा राजा अजातसत्तु वज्जींचा विनाश करायची घोषणा करीत असल्याचे दीघनिकाय दाखवते.[५०] चंड व अनियंत्रित अशा लिच्छवि तरुणांचा एक समुदाय वैशालीच्या महावनात बुद्धापुढे अत्यंत नम्रतेने उभा असलेला जेव्हा लिच्छवि-महत्तर महानामने पाहिला तेव्हा तो उद्‌गारला, " वज्जि ( विजयी ) होतील, वज्जि (विजयी) होतील ) ! "[५१] म्हणून, वज्जि वा वृजि हे त्या देशाचे त्याचप्रमाणे विदेहांच्या व लिच्छवींच्या गणसंघाचे नाव होते.

आपटेंच्या संस्कृत-इंग्लिश डिक्शनरीने वृजि या शब्दाची दखल घेतलेली नाही. कोसंबी वज्जीचे लिच्छवीशी समीकरण करतात व त्याचा अर्थ शेती करून स्थायिक झालेले भटके पशुपालक असा अर्थ लावतात.[५२] पण लिच्छवि व मल्ल हे अवैदिक परंपरेतले होते ही सर्वमान्य वस्तुस्थिती आहे.[५३] वज्जि हे 'वज्जा'चेच एक रूप असावे. विनयपिटक वज्जाचा उल्लेख एक प्रकारचे द्यूत असा करते.[५४] प्रारंभिक अवस्थेत शेतीचा द्यूताशी कसा अविभाज्य संबंध होता हे पुढील प्रकरणात दाखवले जाईल. समाज कृषिप्रधान असल्याने वज्जि गणसंघाचे नामकरण त्याच नावाच्या एका ज्ञाति-मातेवरून झालेले असणे म्हणूनच अशक्य नाही.

गणिकेचे पद वैशालीच्या, वज्जि गणसंघाच्या राजधानीच्या भरभराटीचे कारण असल्याचा रूढ लोकसमज होता-

" . . . तेव्हा राजगृहाचा नगरशेट काही कामानिमित्त वैशालीला गेला. राजगृहाच्या त्या नगरशेटाने पाहिले की वैशाली कशी समृद्धिशाली, माणसांनी गजबजलेली, अन्नपानाने संपन्न, ७,७७७ प्रासाद, ७,७७७ कूटागार, ७,७७७ आराम, व ७,७७७ पुष्करिणी यांनी युक्त आहे; कशी अम्बपाली गणिका अभिरूपा, दर्शनीया, प्रासादिका, परमरूपवती, नृत्य गायन व वादनात पारंगत असून, इच्छुक माणसाकडे रात्रीला पन्नास कार्षापण घेऊन जाते, आणि ज्यामुळे वैशालीची अधिकाधिकच भरभराट होत आहे.

' २ मग तो राजगृहाचा नगरशेट वैशालीतले आपले काम आटोपून राजगृहाला परतला व जेथे मागध राजा सेनिय बिंबिसार होता तेथे गेला. जवळ जाऊन तो मागध राजा सेनिय बिंबिसाराला म्हणाला,— " वैशाली, देव, समृद्धिशाली, माणसांनी गजबजलेली, अन्नपानाने संपन्न, . . . . . . तिच्या-

अनुक्रमणिका

मुळे वैशालीची अधिकाधिकच भरभराट होत आहे. आपले भले होवो, देव, आपणही गणिकेची प्रतिष्ठापना करू या." ...'[५५]

कुलटेची कुळाकडून कुळाकडे भिक्षेसाठी परिभ्रमण करायची प्रथा अम्बपाली पाळीत असे, असे यावरून दिसते. कारण हा वृत्तांत म्हणतो की आपल्या चाहत्यांचा घरी सत्कार न करता तीच त्यांच्याकडे रात्रीचे पन्नास कार्षापण घेऊन जाई (... अभिसटं अत्थिकानं मनुस्सानं पञ्ञासाय च रत्ति गच्छन्ति ...।).[५६] येथे मनुस्स हा शब्द व्यक्तिवाचक वा कुटुंबसभासदाचा वाचक असू शकत नाही. कारण वृजींमध्ये कुटुंबाचे शासन होते (वृजि गार्हपतम्) असे जरी पतञ्जलि म्हणत असला, व गृहपतीचा शब्दशः अर्थ घराचा मुख्य असा जरी होत असला, तरी गृहपतीचा अर्थ अजून कुटुंबप्रमुख असा मात्र होत नव्हता. कोसंबी वैदिक वाङमयातल्या गृहपतीचे विवरण खालीलप्रमाणे करतात :

'...... गहपति हा शब्द विशिष्टभूत अशा गार्हपत्य अग्नीबरोबर येतो. तैत्तिरीय संहितेतही हा (शब्द) छोटया गृहस्थाचा वाचक असू शकत नाही: कारण (अशा गृहस्थाला) एवढे खर्चिक यज्ञ करणे शक्य नव्हते. म्हणून (या शब्दाने) कुलाच्या प्रमुखाचा वा आधुनिक परिभाषेतील बारा वा जास्त कुटुंबांनी बनलेल्या महाघराचा बोध होतो. तैत्तिरीय संहिता २.२.१ (म्हणते) : "ज्याचा शेताबद्दल वा शेजाऱ्याशी वाद आहे त्याने अकरा खापरांवर इंद्र व अग्नि यांना आहुति द्यावी." या परिच्छेदात जमिनीच्या खाजगी मालमत्तेचा पुरावा न शोधता असे वाद पाहिले पाहिजेत की जे शेजारी शेजारी वसलेल्या दोन गणांच्या घटकांमध्ये उद्‌भवू लागल्यामुळे एका गणाच्या चौकटीत वा गणसभेद्वारे सुटू शकत नव्हते. येथे 'त्याने' चा अर्थ गणघटकाचा– मग त्याचा आकार केवढाही असो– मुख्य असा होतो. नंतरच्या काळात, थेट सरंजामशाही कालखंडापर्यंत व नंतरही, मोठी कुटुंबे हा वरिष्ठ वर्गामध्ये नियम राहिला ... ...'[५७]

येथे एक भेद लक्षात घेतला पाहिजे आणि तो हा की सामंतप्रधान समाजाचे वैशिष्टय मोठी एकत्र कुटुंबे हे असते, कुले नाही. छोटे कुल हे मोठ्या कुटुंबापेक्षा लहान असू शकते, पण अगोदर दाखवल्याप्रमाणे सात पिढ्यांचे सर्व चुलत नातेवाईक असत. वज्जीसारख्या गणराज्यांमध्ये गहपति (गृहपति) हे कुटुंबप्रमुखाच्या अर्थी नव्हते. तेथे राहाणारे व्यापारी कुटुंब-प्रमुखाच्या अर्थी गहपति होते हे जरी खरे असले, तरी ते या संघगणाचे

सभासद नव्हते. वज्जींसारख्या संघगणांचा मूलभूत घटक अजूनही कुल होते, एकत्र कुटुंब नाही. लिच्छवि युवकांना पाच कुलधर्मांचा ( कुल-पुत्तस्स पञ्च- धम्मा ) उपदेश करताना बुद्धाने कुल-सभासदांसमोर पुढील जीविकांचे पर्याय उभे असल्याचे सांगितले- (१) मूर्धाभिषिक्त क्षत्रिय राजा, (२) राष्ट्रिक, (३) पेत्तनिक ( वंशपरंपरा पद ), (४) गावाचा ( कुलाचा ) ग्रामणी, (५) व्यापारी पूगाचा ( श्रेणीचा ) ग्रामणी, व (६) ज्ञातीचा मुख्य (... कुलेसु पच्चेकाधिपच्चं कारेन्ति । ).[५९] वड्ढ लिच्छवि हा बुद्धाची माफी मागायला पुत्र व पत्नी, गण - मित्र व सहकुल - वृद्ध, ज्ञाति व कुल-बंधु यांच्यासह गेला (अथ खो वड्ढो लिच्छवी स- पुत्त- दारो, स- मित्त- अमच्चो, स- ञाति- सालोहितो, अल्ल- वत्थो, अल्ल-केसो, येन भगवा तेन उपसङ्कमि ... । )[६०] आराम व पुष्करिणी असलेल्या वैशालीच्या ७,७७७ प्रासादांची-चाननांनी [६१] शेरा मारल्याप्रमाणे हा आकडा अतिशयोक्त असला तरी - एहरेनफेल्स्‌ने[६२] केलेल्या साक्षात् वर्णनावरून केरळीय मातृवंशी नाय-रांच्या थरवाडे कुलघरांशी समर्पक तुलना होऊ शकते.

म्हणून, अम्बपाली कुलमुख्यांना भेटायला जात असे, कुटुंबप्रमुखांना नाही. जर वैशालीची भरभराट गणिकेवर, अम्बपालीवर, अवलंबून होती, तर, उलटपक्षी, तिचा विनाशही गणिकेवर अवलंबून असणे क्रमप्राप्त आहे. बिंबिसारपुत्र अजातसत्तूला उघड युद्धात वज्जींचा नाश करण्यात अपयश आल्यावर त्याने त्यासाठी गणिकेचा उपयोग करून घेतला-

'नंतर असे सांगितले जाते की कुणिकाने गणिका मागधिया व श्रमण कूलवालय यांना एकत्र आणले, ज्यातून वेसालीचा पाडाव झाला. हे घडते, न घडते तोच कुणिक शहरात शिरला व त्याने ते नष्ट केले ... '[६३]

विनयपिटक व दीघनिकाय यानी दिलेला अम्बपालीचा दुसरा वृत्तांत तिच्या पदाच्या पावित्र्याचे कारण समजून घ्यायला मदत करतो. अम्बपालीने जेव्हा ऐकले की बुद्धाचे वैशालीजवळच्या कोटिगाममध्ये आगमन झालेले आहे, तेव्हा ती रथातून आपल्या वैभवशाली दलबादलासह दर्शनाला गेली व भिक्षुसंघासहित दुसऱ्या दिवशी तिच्या घरी जेवायचे आमंत्रण दिले. परतताना रस्त्यावर तिला बुद्धाला भेटायला निघालेले रथारूढ लिच्छवि भेटले. त्यांना खिजविण्यासाठी-

'... अम्बपाली गणिकेने तरुण तरुण लिच्छवींच्या आखांना आख, चाकांना चाक व जूंना जू टकरवले, तेव्हा ते लिच्छवि अम्बपाली गणिकेला

म्हणाले– " कशाकरता, जे * अम्बपाली, तरुण तरुण लिच्छवींच्या आखांना आख, चाकांना चाक, जूंना जू टकरवते आहेस ?"

" कारण मी, आर्यपुत्रांनो, भगवानांना भिक्षुसंघासह उद्याच्या जेवणाचे आमंत्रण दिले आहे."

" देऊन टाक, जे अम्बपाली, हे जेवण ( आम्हाला ) शंभर हजार ( कार्षापणांना )."

" खरेच सांगते मी, आर्यपुत्रांनो, वेसालीही (दासकर्षित) जनपदासह दिली, तरी हे जेवण मी देणार नाही"

'तेव्हा ते लिच्छवी बोटे मोडीत ( उद्गारले )– " जिंकले आम्हाला रे या अम्बकेने, जिंकले आम्हाला रे या अम्बकेने !" ...[६५]

पालि ग्रंथातल्या ' अम्बकाया ' या शब्दाचा खुलासा ऱ्हाईस डेव्हिड्स्ने असा केला आहे–

' अम्बकाय, ज्याचा खुलासा बुद्धघोस इत्थिकाय असा करतो. तुलनार्थ– वाजसनेयि संहितेचा २३.१८ हा सुप्रसिद्ध मंत्र : अम्बे अम्बिके, अम्बालिके इ० बहुधा अम्बका हे कुत्सित संबोधन असावे व त्याचा उद्देश अम्बपालीच्या मालकीच्या व ज्याच्यावरून तिचे नाव पडले त्या अम्ब–वनाचा निर्देश करावयाचा असावा.'[६६]

दोन गोष्टी डोळ्यात भरतात–

१) अम्बपाली अम्बवनाची मालकीण होती, जे तिने बुद्धाच्या भिक्षु-संघाला दान केले. वज्जि संघगणात अजून जमिनीची खाजगी मालमत्ता विकसित झालेली नसताही एक मोठे वन या गणिकेच्या मालकीचे होते ज्याचा विनियोग ती चंड व गणतंत्रवादी लिच्छवींना एका शब्दानेही न विचा-रता करू शकली. येथे हे लक्षात घेणे आवश्यक आहे की त्या काळात प्रत्येक नगराचे व गावाचे ' स्वतःचे मंगल ' वन ' असे. अहल्या, जिचा मुलगा शता-नंद विदेहांच्या जनक राजाचा ( सीतेचा धर्मपिता ) पुरोहित होता, ती मिथिले-जवळच्या मंगल वनात राहत असे ( मिथिला–उपवने तत्र आश्रमं दृश्य राघवः । १.४८.११ ).

---

* धुळे जिल्ह्यातील भिलवानमध्ये वडील माणसाशी बोलताना ' जी ' ऐवजी ' जे ' असे वाक्याच्या प्रारंभी म्हणतात.

२ ) अम्बपालीला लिच्छवींनी ' अम्बका ' असे संबोधले आहे. हा शब्द ' अम्बा 'चा पर्यायवाची असून त्याचा अर्थ आई असा होतो. ती केवळ वेश्याच असती तर तुच्छतेने वा चेष्ठेनेही लिच्छवि तिला ' अम्बका ' म्हणाले नसते.

निष्कर्ष अपरिहार्य आहे. अम्ब-पाली वास्तवात वज्जींची गण-माता होती. तिचे नाव वज्जिगणाच्या पुरोहितेचा ( priestess ) किताब होता. त्याचा अर्थ ' अम्बेची ( मातृदेवतेची ) पुरोहिता ' असा होतो.

मुळात गणिकेचाही अर्थ गणाची शासनकर्ती असाच असावा. कारण बुद्धाच्या काळातल्या धार्मिक सांप्रदायांच्या तीर्थङ्करांना बौद्ध व जैन धर्मग्रंथां-मध्ये गणी, गणधर, गण-आचरिय व सङ्घी-अर्थ धार्मिक गणांचे वा संघांचे मुख्य- असे म्हटले आहे.[६७] बुद्धाचा भिक्षु-संघ घटना व कारभार याबाबतीत गणसमाजाची प्रतिकृती होता हे सुप्रसिद्ध आहे.[६८] महावीराचा जैन भिक्षु संघ वज्जिगणसंघाची हुबेहूब प्रतिमा होती. महावीर विदेह गणाच्या एका ज्ञाति-मुख्याचा मुलगा होता; म्हणून णाय ( संस्कृत ज्ञातृ ), ज्ञातिमुख्याचा मुलगा ( णाय-पुत्त ), त्या ज्ञातीच्या काश्यप कुलाचा चंद्र ( णाय-कुल-चन्द, णाय-कुल- निव्वत्त ), विदेह, विदेह गणाचा पुत्र ( विदेह- दिन्न, विदेह- जच्च, विदेह-सूमाल )[६९] ही त्याची विविध विशेषणे होती. मागध राजा अजात-सत्तूला ( तोही एक वेदेहिपुत्त ) त्याच्या एका अमात्याने सांगितले की नग्न, ज्ञातृ-पुत्र महावीर हा त्याच्या धार्मिक गणाचा मुख्य व आचार्य आहे. ( " अयं, देव, निगण्ठो, नाट-पुत्तो, सङ्घी चेव, गणी च, गणआचरियो च ...[७०]

उत्तराध्ययन ( ३०.३३ ) जैन श्रमणांना खालील दहा प्रकारच्या सेवांची शिफारस करते-

आयरिय-उवज्झाए-थेर-तवस्सी-गिलाण-सेहाण ;

साहम्मिय-कुल-गण-सङ्घ-संगयं तम् इह कायत्वं ।।

[ ' ३. दहा प्रकारच्या सेवा आहेत, ... जसे आचार्य, उपाध्याय, स्थविर, तपस्विन्, ग्लान, शैक्ष्य, सार्धमिक, कुल, गण व संघ यांच्या सेवा. '[७१] ]

हे कुल, गण व संघ ना गणघटक होते ना गण, तर ती जैन श्रमण-संघाच्या घटकांची नावे होती. महावीराचा जैन श्रमणसंघ आकृतीत असा दिसेल-







## सङ्घी महावीर ( काश्यप गोत्र )

| १ | २ | ३ | | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| गणधर | गणधर | गणधर | | गणधर | गणधर | गणधर | गणधर | गणधर | गणधर | |
| मण्डिकपुत्र ( वासिष्ठ गोत्र ) | मौर्यपुत्र ( काश्यप गोत्र ) | मेतार्य | प्रभास | इंद्रभूति (गौतम गोत्र ) | अग्निभूति ( गौतम गोत्र ) | वायुभूति ( गौतम गोत्र ) | आर्यव्यक्त (भारद्वाज गोत्र ) | आर्य सुधन्वन् (अग्नि वेश्या-यन गोत्र ) | अकम्पित ( गौतम गोत्र ) | अचलभ्रातृ ( हारितायन गोत्र ) |
| | | (कौण्डिण्य गोत्र) | | | | | | | | |
| गण २५० श्रमण | गण २५० श्रमण | गण ३०० + ३०० श्रमण | | गण ५०० श्रमण | गण ५०० श्रमण | गण ५०० श्रमण | गण ५०० श्रमण | गण ५०० श्रमण | गण ३०० + ३०० श्रमण | |

हा श्रमणसंघ गणी आर्य सुहस्तिनपासून कुल व शाखा यांनी युक्त अशा गणांमध्ये विकसित होत गेला.[७२] महावीराचा मामा चेडग, एक विदेह व वज्जींचा राजा, वासिष्ठ गोत्राचा होता. प्राचीन गणसमाजाचा असा एक कायदा होता की केवळ ज्ञातृच राजा होऊ शके. म्हणून चेडग वाशिष्ठ वा हैहय ज्ञातीचा ज्ञातृ असला पाहिजे. महावीर स्वतः काश्यप ज्ञातीच्या ज्ञातृचा मुलगा असल्यामुळे त्याचे लग्न दुसऱ्या ज्ञातृच्या मुलीशी होणे क्रमप्राप्त होते. त्याची पत्नी कौण्डिण्य गोत्राची होती.[७३] मण्डिकपुत्र हे व मौर्यपुत्र हे गणधर अनुक्रमे वासिष्ठ व काश्यप गोत्राचे होते आणि मेतार्य व प्रभास हे गणधर कौण्डिण्य गोत्राचे. विदेह ज्ञातींच्या प्रतिकृती असलेल्या चार गणधरांचे हे तीन गण वजा केल्यानंतर उरलेले सहा गण हे लिच्छवि ज्ञातींच्या प्रतिमा असल्या पाहिजेत हे उघड आहे. धार्मिक शब्दजंजाळ झाडून टाकले, तर प्रगट होणारे वज्जि गणसंघाचे मानचित्र असे असेल—




अशा महान् संपन्न व सामर्थ्यशाली गणसंघाची अम्बपाली ही गणमाता होती. पण गणसंघाच्या या 'महानते' मुळेच गणिकेच्या पदाचा गणमात्रेतून

सर्वोत्तम श्रेणीच्या वेश्येत कायाकल्प होऊन गेला होता. म्हणूनच वज्जींच्या या सर्वात सुंदर व संपन्न. सर्वात पवित्र व स्वतंत्र स्त्रीने 'संसार' सोडला व आपली उल्केसारखी ज्वलंत जीवनी बौद्ध भिक्षुणी म्हणून संपवतानाही पश्चात् कालाकरता थेरि-गाथेतले एक सर्वात सुंदर गीत सोडून ती गेली.

माधवी, 'शिलप्पदिकारम्' या तामिळ महाकाव्याचे एक प्रमुख पात्र व चोलांची राजधानी पुहारची गणिका, एका देवी जोडप्याची संतान होती-

'पोडिगिल पर्वतावर राहाणारे विख्यात ऋषि अगस्त्य यांनी एकदा इंद्र देवाचा मुलगा व अप्सरा उर्वशी यांना उच्छृङ्खल वर्तनाबद्दल शाप दिला. पण उर्वशीने आपली सर्वांगपरिपूर्ण कला रंगभूमीवर प्रदर्शित करताच मुनीने तिला उःशाप दिला. अशा या उमद्या व धाडशी युगुलाला माधवी नावाची सुंदर मुलगी झाली ...'[७८]

तिनेही आपल्या जीवनाची सांगता बौद्ध भिक्षुणी म्हणून केली.

सामंतप्रधान राजेशाहीत ही एकेकाळची गणशासिका संघगणातले तिचे औपचारिक पावित्र्य गमवते एवढेच नाही, तर तिचे रूपांतर वास्तविक व कायदेशीर 'राजदासी'त होते—

'..... ज्या मुलीवर शासन एक हजार नाणी खर्च करी व जिला सरकारी खर्चाने ( तिच्या आचार्यांचाही योगक्षेम सरकार चालवी ) सर्व कलांचे शिक्षण देई, तिच्यावर, तिची कमाई, मालमत्ता, इत्यादी बाबत, संपूर्ण स्वामित्व गाजवी हे उघड आहे. जरी तिला सर्व प्रकारच्या ( दासीला लायक ) कामांना लावले जात नसे, तरीही तिच्यावर खर्च झालेल्या रकमेच्या चोवीस पट 'निष्क्रय-धन' म्हणून आकारण्याची तरतूद तिच्या स्वातंत्र्याचा गंभीर संकोच तर करीच, पण तिला जवळजवळ दासीच्या दर्जाला आणून ठेवी. तसेच दासीप्रमाणे तिचा एक स्वामी नसे. वृद्ध गणिकेला राजाच्या सेवेत नियुक्त करायची तजवीज दाखवते, की २४,००० पण 'निष्क्रयधन' देऊन तिला मुक्त करणारा विमोचक तिला लाभला नाही, तर राजाच्या कोणत्याही दासीप्रमाणेच तिची गती होत असे. तिच्या नातेवाईकांच्या ( भाऊ, इ० ) मुक्ततेकरता निर्धारित केलेल्या निष्क्रय-धनाच्या वेगवेगळ्या रकमांवरून या धारणेला पुष्टीच मिळते.'[७९]

म्हणूनच उज्जयिनीची गणिका वसंतसेना आपली दासी मदनिका हिला उद्वेगाने म्हणते— "... जइ मम सच्छन्दो, तदा विणा अत्थं सब्बं परिजणं अभुजिस्सं करइस्सं। (जर मी स्वतंत्र असते तर [ माझ्या ] सगळ्या दासदासींना विनामूल्य मुक्त केले असते.) ... ।"[७६]

अनुक्रमणिका

गण–मातेचा गणिका वेश्येतला हा कारुण्यपूर्ण कायाकल्प पुरुषाला, व्यक्तिगत आत्म्याला, मोहविण्यासाठी स्वतःला नर्तकीत परिवर्तित करणाऱ्या सांख्य प्रकृतीत, जगन्मातेत, प्रकर्षाने प्रतिबिंबित झालेला आहे –

रङ्गस्य दर्शयित्वा निवर्तते नर्तकी यथा नृत्यात्।
पुरुषस्य तथाऽत्मानं प्रकाश्य विनिवर्तते प्रकृतिः ॥ [७७]

[ 'ज्याप्रमाणे एखादी नर्तकी प्रेक्षकांसमोर स्वतःला रंगभूमीवर प्रदर्शित केल्यानंतर नृत्यापासून निवृत्त होते, त्याप्रमाणे प्रकृति पुरुषासमोर स्वतःला प्रदर्शित केल्यानंतर ( क्रियेपासून ) निवृत्त होते.' ] [७८]



संदर्भ —

१. इरावती कर्वे, किनशिप ऑर्गनायझेशन इन इंडिया, पा. ८२
२. उक्त, पा. ४७.
३. पां. वा. काणे, हिस्टरी ऑफ धर्मशास्त्राज, खंड २, भाग १, पा. ४९३-४९४.
४. दा. ध. कोसंबी, मिथ अँड रिॲलिटी, पा. ४६.
५. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड १४, पा. २०५-२०७.
६. पां. वा. काणे, उक्त ग्रंथ, पा. ४६३.
७. वा. श. अग्रवाल, इंडिया ॲज नोन टु पाणिनि, पा. १८९.
८. उक्त, पा. ८.
९. उक्त, पा. १८९.
१०. उक्त, पा. ८–९.
११. उक्त, पा. ६४.
१२. लक्ष्मण सरूप, निघण्टु अँड निरुक्त, पा. १११.
१३. पद्मनाभ मेनन, हिस्टरी ऑफ केरळ, खंड १, पा. ३१–३२.
१४. पां. वा. काणे, उक्त ग्रंथ, पा. १२४–१२६.
१५. लक्ष्मण सरूप, उक्त ग्रंथ, पा. १६६.
१६. उक्त, पा. १४७.
१७. रा. श. शर्मा, लाइट ऑन अर्ली इंडियन सोसायटी अँड एकॉनॉमी, पा. ९९.

१८. वा. श. अग्रवाल, उक्त ग्रंथ पा. २०४–२०५
१९. जगदीश काश्यप ( सं. ), अङ्गुत्तरनिकायपालि, ८. ४–३.
२०. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड १७, पा. १५७.
२१. एम्. के. मैती, एकॉनॉमिक लाइफ ऑफ नॉर्दर्न इंडिया इन द गुप्त पीरिअड, पा. ३८.
२२. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड २५, पा. २३५.
२३. वा. श. अग्रवाल, उक्त ग्रंथ, पा. १९७–१९८.
२४. रा. श. शर्मा, उक्त ग्रंथ, पा. १०३.
२५. एस्. के. मैती, उक्त ग्रंथ, पा. ३९–४०.
२६. ऐतिहासिक पत्रसंग्रह, पत्र क्र. २२९/२५, ता. ६-९-१७८५, नागपूरकर भोसले दप्तर, म. गो. रानडे व के. टी. तेलंग, राइज ऑफ मराठा पॉवर अँड अदर एसेज, ग्लीनिंग्ज फ्रॉम मराठा क्रॉनिकल्स, पा. २०२.
२७. जदुनाथ सरकार, शिवाजी अँन्ड हिज टाइम्स, पा. ३५०–३५२.
२८. लक्ष्मण सरूप, उक्त ग्रंथ, पा. ८
२९. देवीप्रसाद चट्टोपाध्याय, लोकायत, पा. २७८.
३०. उक्त, पा. ३३३.
३१. रॉबर्ट ब्रिफॉल्ट, द मदर्स, खंड ३, पा. २.
३२. ए. एस्. आळतेकर, द पोझिशन ऑफ वुइमेन इन हिंदु सिव्हिलिझेशन, पा. २३४–२३५; द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड २९, पा. ३३३ इ.
३३. देवीप्रसाद चट्टोपाध्याय, लोकायत, पा. २७०-२७१.
३४. डब्ल्यू. डी. व्हिटने, अथर्ववेद संहिता, पा. १५-१६, ४३६.
३५. आर. ग्रिफिथ, हिम्स ऑफ द ऋग्वेद, खंड २, पा. ७३६.
३६. पां. वा. काणे, उक्त ग्रंथ, पा. २९३-२९५.
३७. म. दा. साठे, व्याकरणसिद्धान्तकौमुदी, भाग २ पा. ३९.
३८. जगदीश काश्यप ( सं. ), विनयपिटक, पाचित्तियपालि, ५.२९.१९२-१९३.
३९. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड ११, पा. १७५.
४०. जगदीश काश्यप ( सं. ), संयुत्तनिकायपालि. ४७-२०-२३.
४१. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड ११, पा. १७५
४२. राहुल सांकृत्यायन, दीघनिकाय ( हिंदी ), पा. ७३,८८; मज्झिमनिकाय ( हिंदी ), पा. ३२१,३२५.
४३. जगदीश काश्यप, धर्मरक्षित : संयुत्तनिकाय ( हिंदी ), पा. ६९६.

४४. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड ११, पा. १७५—१७६.
४५. वा. श. अग्रवाल, उक्त ग्रंथ, पा. ८–९
४६. महाभारत, १-१२०
४७. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड २२ पा.२६६.
४८. राहुल सांकृत्यायन, मध्यदेश, पा. १८
४९. ब. ना. पुरी, इंडिया इन द टाइम ऑफ पतञ्जलि, पा. ८२.
५०. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड ११, पा. १–२
५१. जगदीश काश्यप (सं.), अङ्गुत्तरनिकायपालि, ५-६-८.
५२. दा. ध. कोसंबी, द कल्चर अँड सिव्हिलिझेशन ऑफ इंडिया इन हिस्टॉरिकल आउटलाइन, पा. १२१.
५३. हिरालाल जैन, भारतीय संस्कृतिमें जैन धर्मका योगदान, पा. १८.
५४. जगदीश काश्यप (सं.), विनयपिटक चुल्लवग्गपालि, १-३-२१–२२
५५. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड १७, पा. १७१–१७२.
५६. जगदीश काश्यप (सं.), विनयपिटक महावग्गपालि, ८-१-१.
५७. दा. ध. कोसंबी, ॲन इंट्रॉडक्शन टु द स्टडी ऑफ इंडियन हिस्टरी पा. ११२–११३.
५८ देव राज चानना, स्लेव्हरी इन एन्शट इंडिया, पा. १५८.
५९. जगदीश काश्यप (सं.), अङ्गुत्तरनिकायपालि, ५-६-८-५,११; काशी प्रसाद जयस्वाल, हिंदु पॉलिटि, पा. ७७, ७९—८०.
६०. जगदीश काश्यप (सं.), विनयपिटक, चुल्लवग्गपालि, ५.९.२४.
६१. देव राज चानना, उक्त ग्रंथ, पा. १२३ इ.
६२. ओ. आर. एहरेनफेल्स, मदर–राइट इन इंडिया, पा. ६१.
६३. जगदीशचंद्र जैन, लाइफ इन एन्शंट इंडिया ॲज डिपिक्टेड इन द जैन कॅनन्स, पा. ३८३.
६४. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड २२, पा. १०५–१०८; खंड ११, पा. ३०–३४.
६५. उक्त ग्रंथ, खंड १७, पा. १०६–१०७.
६६. उक्त ग्रंथ.
६७. जगदीश काश्यप (सं.), दीघनिकायपालि, सीलक्खन्धवग्गो, २. १.-२–७; द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड २२ पा. ११३, २७३, २७८, २८४, २८६ इ.

६८. काशी प्रसाद जयस्वाल, हिंदु पॉलिटी, पा. ४२–४४; देवीप्रसाद चट्टोपाध्याय, लोकायत, पा. ४५९ इ.

६९. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खंड २२, पा. १९४.

७०. जगदीश काश्यप (सं.), दीघनिकायपालि, सीलक्खंधवग्गो, २-१-७.

७१. द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट, खड ४५, पा. १७९

७२. उक्त ग्रंथ, खंड २२, पा २९०—२९३.

७३. उक्त ग्रंथ, पा. १९३.

७४. ॲलेन डॅनिएलू, सिलफदिकारम् (इंग्रजी अनुवाद), इलस्ट्रेटेड वीकली, २७-९-६४.

७५. देव राज चनना, स्लेव्हरी इन एन्शंट इंडिया, पा. १००–१०१.

७६. मृच्छकटिक, अंक ४.

७७. सांख्यकारिका, ५९.

७८. गंगानाथ झा, द तत्त्वकौमुदी, पा. १५७

श्रीमती प्रेमा कंटक

# स्वप्न संपले! बंधन तुटले!!

ते १९२३ साल असावे. मला नीट आठवत नाही. परंतु त्या काळचा इतिहास वाचल्यावर मी अटकळ केली. मुंबईत मी माझ्या वडिलांच्या घरी अध्ययन करीत होते. शाळा व कॉलेज यांच्या संधिकालावर असेन. महाराष्ट्रांत मुळशी प्रकरण गाजत होते. जरी आमच्या घरी वृत्तपत्र घेतले जात नसे तरी इकडून तिकडून समाचार मिळे. शिवाय मधून मधून मुळशीसत्याग्रहासाठी मदत मागणारे स्वयंसेवक गाणी गात रस्तोरस्ती व वाड्यावस्तीतून फिरत असत. आम्ही गिरगावात ज्या वाडीत राहात होतो, त्या वाडीत एके दिवशी रात्र पडल्यावर, मधल्या आवारात सभा भरली. चारीबाजूस चाळी, मध्ये विस्तृत आवार, त्याच्या एका टोकाला एक वटवृक्ष व त्याच्या तळाशी पार बांधलेला. त्या पारावर खुर्च्या, मेज ठेवून व्यासपीठ केले होते. सेनापति बापट मुख्य वक्ते होते. मीही व्यासपीठाच्या उजवीकडील चाळीत पहिल्या सज्ज्यावर बसून कुतूहलाने सभेतील कार्यवाही पहात होते. एका मुलीने गाणे म्हटले. नंतर सेनापती बापट बोलले. त्यांचे भाषण चालू असता, व्यासपीठासमोरून एक व्यक्ति सभेत प्रवेश करताना दिसली. मध्यम उंची, धोतर, सद्रा व डोक्यावर पांढरी खादीची टोपी असा पेहराव केलेली ती व्यक्ति व्यासपीठाजवळ पोचताच तिचे स्वागत करण्यात येऊन तिला मानाची जागा देण्यात आली. से. बापटांचे भाषण संपल्यावर त्या नवागत व्यक्तीचे नाव पुकारण्यात आले: शंकरराव देव आणि श्री. देवांनी भाषण सुरू करताच श्रोत्यांच्या मनाची पकड घेतली व बराच वेळ लोकांना त्यांनी मंत्रमुग्ध केले! मलाही त्यांचें भाषण आवडले. त्यांच्या भाषणावरून ते नुकतेच तुरुंगवास भोगून आले होते असे दिसून आले. कारण त्यांनी तुरुंगातील जीवनाचे मोठे रसभरित वर्णन केले! आता वाटते की, तो त्यांचा पहिला एक महिन्याचा कारावास असावा.

त्यावेळी माझ्या मनात यत्किंचित् देखील भविष्याची कल्पना येणे शक्य नव्हते! या गृहस्थांशी माझ्या जीवनाचा पुढे निकट संबंध येणार असून तो सतत चाळीस वर्षे टिकणार आहे हे तेव्हा मला अज्ञात होते!

अनुक्रमणिका

त्यानंतर सन १९३१ साली महात्मा गांधीजींच्या समवेत मी एकदा विलेपार्ले (मुंबई उपनगर) येथील सत्याग्रहछावणीत गेले होते. तेथे महात्माजींचे व्याख्यान होते. महाराष्ट्रातील सत्याग्रही स्वयंसेवकांची गर्दी जमली होती. त्यात कमरेला धोतर गुंडाळून, अंगावर उपरणे, दाढीमिशा व डोक्यावर केस वाढवलेले– अशा स्वरूपात श्री. शंकरराव देवांचे दुसरे दर्शन झाले !

सन १९२९ पासून माझा निवास साबरमती येथील सत्याग्रहाश्रमात होता. सन १९३३ च्या जुलैमध्ये आश्रमाचे समर्पण झाले ! आश्रमीय मंडळीबरोबर मलाही कारागृहवास मिळाला व सन १९३४ च्या १ जुलै रोजी दुसऱ्या खेपेच्या कारागृहवासातून मुक्त झाल्यावर मी महात्माजींच्या अनुज्ञेने महाराष्ट्रात सेवा करण्याच्या उद्देशाने मुंबईस पोचले. तेव्हा माझे पूर्वीचे शिक्षक व नंतरचे स्नेही, 'नवाकाळ' पत्राचे उपसंपादक श्री. भा. रा. धुरंधर यांनी श्री. शंकरराव देवांची व माझी गाठ घालून दिली, तो तिसरा प्रसंग आठवतो. मला महाराष्ट्राची माहिती नव्हती. महाराष्ट्रात अेखादा गांधीविचाराचा आश्रम असल्यास तेथे राहून विधायक सेवाकार्य करण्याची माझी इच्छा होती. श्री. धुरंधरांना मी माझी इच्छा पत्रद्वारा अगोदर कळवली होती. त्यांनी श्री. शंकरराव देवांचा मुक्काम मुंबईत असताना त्यांची गांठ घेऊन त्यांना माझी माहिती सांगितली व इच्छाही कळवली. तेव्हा आपण पुण्यानजीक एक आश्रम नव्याने स्थापू इच्छितो, प्रेमाबाओींची त्यात प्रविष्ट होण्याची इच्छा असेल तर त्यांना अवश्य प्रवेश देऊ, असे श्री. देवांनी श्री. धुरंधरांना सांगितले व त्यांच्या मध्यस्थीने श्री. देव माझ्या भेटीला आले.

त्या दिवशी मुंबओीत माझा मुक्काम माझी मैत्रीण कृष्णाकुमारी घुमटकर हिच्या घरी होता. तीही स्वातंत्र्यसंग्रामात उडी घेतलेली मुंबओीची कार्यकर्ती होती, तरी तिची व श्री. देवांची गांठभेट कधीच झाली नव्हती. तीही त्यांना भेटावयास उत्सुक होती. सकाळी नऊ वाजण्याची वेळ असावी. श्री. धुरंधर श्री. शंकरराव देवांना घेऊन आले. धुरंधर पुढे व श्री. शंकरराव त्यांच्या पाठीशी चालत होते. दिवाणखान्याच्या अेका कोपऱ्यात आरामखुर्ची होती तीवर श्री. शंकरराव बसले व आम्ही त्यांचेसमोर खुर्च्यांवरून बसलो. श्री. शंकररावांचे हे तिसरे दर्शन होते ! लुंगी पद्धतीने नेसलेले धोतर व उपरणे पूर्वीप्रमाणेच. हातात अेक किरमिजी रंगाची खादीची लहान पिशवी होती. केस कापलेले, दाढीमिशा तोकड्या, डोके उघडे ! तीन प्रसंगी त्यांचे तीन प्रकारचे स्वरूप लक्षात येऊन मी कुतूहलानेच त्यांच्याकडे पहात होते ! धुरंधरांनी परिचय



अनुक्रमणिका







करून दिल्यावर त्यांनी खाली मान घालून, डोळे मिटून बोलावयास सुरुवात केली ! आपण स्थापू इच्छीत असलेल्या आश्रमाची योजना सांगितली व त्यात मला प्रवेश देण्याचे आश्वासन दिले; माझ्या आठवणीप्रमाणे ते तीच तीच वाक्ये वारंवार बोलत होते व हेही सुचवीत होते की, महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीवर मला निवडून यावयाचे असेल तर त्याही कामी आपण मदत करू ! हे ऐकून मी स्तंभित झाले ! मी तोवर एकदाही काँग्रेसची सामान्य सभासद झाले नव्हते. मला निवडणुका व पदे यांचे मुळीच प्रेम नव्हते. खेड्यात राहून सेवा करण्याची रमणीय व प्रसन्न चित्रे मी मनाशी रंगवीत होते ! त्यात हे निवडणुकीचे शंखवादन कशाला ? मी जरा उतावळेपणानेच त्यांना म्हटले : "मला निवडणुकीत पडावयाचे नाही. प्रांतिक समितीतही जावयाचे नाही. खेड्यात राहून काम करावयाचे आहे. त्याच्याबद्दल बोला." त्यावर पुन्हा त्यांनी तोच सूर काढला ! "आमच्या महाराष्ट्राच्या प्रांतिक कमिटीत अेकही स्त्रीसभासद नाही. मुंबईच्या लीलावतीबाओी मुनशी या अेकच बाओी महाराष्ट्राच्या प्रांतिक समितीवर निवडून येत असतात. तुम्ही महाराष्ट्रात राहिल्यावर तुम्हांलाही निवडून येण्यास हरकत नाही. मी मदत करीन." मी अस्वस्थ झाले ! अस्वस्थता वाढण्याचे आणखीही एक कारण असे झाले की, आमचे संभाषण चालू असताना ते मुळीच वर मान करून मजकडे किंवा किसनकडे (—माझ्या मैत्रिणीचे रूढ नाव—) दृष्टिक्षेपसुद्धा करीनात ! तीही बोलत होती. पण ते आपले खाली मान घालून डोळे मिटूनच बोलत होते ! आम्हांला विचित्र वाटत होते. शेवटी ते म्हणाले : "आता दुपारच्या गाडीने मी पुण्यास जाणार आहे." तेव्हा मी लगेच म्हटले : "मग मीही तुमच्या-बरोबर येते. कामास त्वरेने लागण्याची उत्कंठा मला वाटत आहे." मग मात्र ते हादरले ! "नको, नको, मी पुढे जातो. आमचे सहकारी आचार्य भागवत यांना भेटून आपणांबद्दल मी सांगतो. आपण नंतर यावे" असे ते म्हणाले. मला आपल्या सोबत नेण्याची त्यांची तयारी नव्हती, जरी मी त्यांच्याशी एकत्र प्रवासाच्या निमित्ताने अधिक परिचय करून घेऊ इच्छीत होते. शेवटी ठरले की, त्यांनी दुपारी निघावे व श्री. धुरंधरांसमवेत मी सायंकाळच्या गाडीने निघावे. आमचा निरोप घेऊन ते गेले तेव्हा "व्याधाहातून सुटला । विहंग जैसा ॥" अशी त्यांची स्थिती झाली असावी. त्यांचा माझा खूप परिचय झाल्यानंतर एकदा त्यांनी मला ही हकीकत सांगितली. माझ्यासारख्या नवख्या तरुणीने एकदम त्यांच्यासारख्या ब्रह्मचाऱ्याशी मोकळे वागावे व 'सोबत येते' म्हणावे, हे त्यांना सहन झाले नाही. ते भेदरले !

पण ते गेल्यावर आम्ही दोघी खूप हसलो व टीका करू लागलो ! "काय ग बाओी ही तऱ्हा ! खाली मान घालून डोळे मिटून बोलतात म्हणजे काय ! या पुणेरी भटांना स्त्रियांशी कसं वागावं ते कळतच नाही !! अगदीच जुन्या वळणाचे ! " सत्याग्रहाश्रमामध्ये स्त्रीपुरुष मोकळेपणे परस्परांशी वागत. तेथील वातावरणच पवित्र व घरोब्याचे ! किसन म्हणू लागली : "या पुणेरी आश्रमात तुझं कसं होओील ! सारी भटं अशीच असतील– पंचा–फॅशन ! " काही काही बोलणे झाले ! पण शेवटी सायंकाळी धुरंधरांसह मी पुण्यास गेले व पुढील घटना होत गेल्या. त्यांचे वर्णन करण्याचे हे स्थळ नव्हे.

५ ऑगस्ट १९३४ रोजी सासवड येथे चांभळी नदीच्या किनाऱ्याजवळ अेका जुन्या एकान्त वाड्यात आश्रमाची स्थापना झाली. मी असे मानून घेतले होते की, आश्रम सुरू झाल्यावर श्री. शंकरराव आश्रमातच राहातील. पण तसे घडले नाही. त्यांचा निवास मुख्यतः पुण्यातच असे. ते वारंवार प्रवास करीत व राजकारणात ते आकंठ बुडाले होते. तरी जेव्हा कधी ते आश्रमात येत असत व थोडा काल मुक्काम करीत तेव्हा बोलणे, चालणे होत असे. सासवडास येण्यापूर्वी मला पुण्यात तीन आठवडे राहावे लागले होते. आश्रमासाठी योग्य जागा शोधण्यासाठी आम्ही हिंडत होतो व पुण्याच्या आसपासची गांवे पहात होतो. तेव्हा श्री. शंकरराव बहुधा प्रवासात असायचे. मुक्कामात ते रोज सकाळी पर्वतीच्या बाजूला फिरावयास जात असत. तेव्हा सोबत मला घेऊन जात. या काळात त्यांची भीड बरीच चेपली व आमचे बोलणे मोकळे होऊ लागले. त्यावेळी ते काही व्रते व नियम पाळीत असत असे आठवते. गुरुवारी मौन, शेंगदाणे रात्री पाण्यात भिजत ठेवून सकाळी न्याहारी म्हणून खाणे– असे काही प्रकार चालत. सत्याग्रहाश्रमातही असे नेम पाळणारी माणसे होती. त्यामुळे मला श्री. शंकररावांच्या नेमांचे विशेष वाटत नसे. त्यावेळी त्यांच्या बोलण्यात, विनोद व शाब्दिक कोटया मधून मधून येत. अेकदा आम्ही सकाळी फिरावयास गेलो असताना अेक गृहस्थ समोरून आला व श्री. शंकररावांजवळ काही तक्रार करू लागला. तो पुणे नगरपालिकेचा सभासद होता पण पोशाखावरून अगदी गबाळ मजूर वाटत होता. कोणत्यातरी ठरावाच्या मतमोजणींत त्याने भाग घेऊ नये म्हणून कांही लोकांनी त्याला अज्ञात स्थानीं अडकावून ठेवले होते अशी त्याची तक्रार होती. त्याचे व श्री. शंकररावांचे बोलणे झाल्यावर तो गेला. मी श्री. शंकररावांना म्हटले, "लोक किती विचित्र ! त्याला असं कां वागवलं असेल ! " ते जरा जोरांत उद्गारले, "तुम्हाला माहीत नाही ! पायघोळ संत आहे तो ! " हे विशेषण

अनुक्रमणिका

ऐकून मला हसू आले. मला त्याचा अर्थ कळला नाही, अजूनही माहीत नाही, पण कांहीतरी मजेदार नवा शब्द ऐकल्यामुळे करमणूक झाली.

मी सासवडच्या आश्रमात रमले. येथे राहिल्यावर मला श्री. शंकररावांच्या वर्तुळाची व महाराष्ट्रांतील परिस्थितीची ओळख हळू हळू होऊ लागली. माझे पूर्ववय मुंबईत व नंतरची पांच वर्ष गुजरातेत गेल्यामुळे महाराष्ट्राचा परिचय मला नव्हता. आचार्य भागवत व श्री. शंकरराव देव यांच्या सान्निध्यात आल्यावर तो होऊ लागला. पुढे फैजपूर कॉंग्रेसच्या निमित्ताने राजकीय क्षेत्रातील कार्यकर्त्यांचाही माझा परिचय झाला. लहानपणापासून माझ्यांत माझ्या स्त्रीत्वाची जाणीव नव्हतीच. यामुळे लहानपणी व अध्ययनकालात ( अंगी तारुण्य आल्यावर ) मला कुटुंबांतील वडील स्त्रियांकडून फार बोलून घ्यावे लागत असे. या माझ्या स्वभावविशेषाचा असा एक परिणाम झाला आहे की स्त्रिया व पुरुष यांचेशी माझे सारखेच निकट संबंध जुळतात. कोठेही आडपडदा नसतो. त्यामुळे मला मैत्रिणींप्रमाणे मित्रांचाही भरपूर लाभ झाला आहे. श्री. शंकररावांशी व आचार्य भागवतांशी खूप परिचय झाल्यावर आमच्यांत घरोबा निर्माण झाला. आचार्य व मी आश्रमांत एकत्र राहत असल्यामुळे आमच्यांत पत्रव्यवहार क्वचित् होई. पण श्री. शंकररावांशी मात्र सतत पत्रव्यवहार चाले. आमच्यातील बराचसा पत्रव्यवहार अद्याप नष्ट झालेला नाही. सन. १९४० पासूनची श्री. शंकररावांची मला आलेली पत्रे मजजवळ आहेत. त्यांना गेलेली माझींही आहेत. श्री. शंकररावांचे चरित्र लिहिताना मला या पत्रांचा उपयोग करण्याचा माझा विचार आहे. कारण पुष्कळ वर्षांमागे झालेल्या घटना आता नीट स्मरत नाहीत. त्या या पत्रांमुळे आठवू लागतील. या पत्रातीलच कांही उतारे या लेखांत देऊन लेख पुरा करू इच्छिते.

महात्मा गांधींच्या आश्रमात गेल्यावर मी दर वर्षी नारळी पौर्णिमेच्या दिवशी ते जवळ असल्यास त्यांच्या हातात राखी बांधीत असे; दूर असल्यास पाठवून देई; संक्रांतीच्या दिवशी तिळगुळ पाठवी. हा माझा क्रम त्यांच्या स्वर्गवासापर्यंत अखंड चालला. तुरुंगात असतांना सुद्धा मी त्यांना राखी व तिळगुळ पाठवले होते. सासवडला आल्यावर देखील माझा हाच क्रम श्री. शंकरराव, आचार्य भागवत वगैरे मानलेल्या बांधवांच्या बाबतींत सुरू झाला. सन १९४० च्या जानेवारीत मी बिहारमध्ये रामगढ कॉंग्रेसच्या अधिवेशनासाठी स्वयंसेविकादल तयार करण्याचे काम करीत होते. तरी तेथूनही संक्रांतीचा तिळगुळ श्री. शंकररावांना पाठवण्याची व्यवस्था मी केली. त्याच वेळी श्री. शंकरराव एका संकटांतून पार पडत होते. त्यांचे दैनिक पत्र ' लोकशक्ति ' यावर गंडांतर आले होते.

त्यांच्यापुरता तो एक मानसिक चिंतेचा व क्लेशाचा विषय झाला होता. तिळगुळ मिळाल्यावर त्यानी ता. १८ जानेवारी १९४० रोजी पहाटे ५ वाजता बसून पत्र लिहिले त्यातील उतारा पुढीलप्रमाणे:–

"आपला तिळगुळ वेळेवर – अगदी वेळेवर मिळाला. स्पर्शाला खरबरीत, पण चवेला गोड होता. तो तोंडात विरघळत असता एक आवाज ऐकू येत आहे असा भास झाला. 'मला ज्या माणसाने पाठविले त्याची हुबेहुब प्रतिमा मी आहे' असे तो हलवा म्हणाला असे वाटले ! आता एक वर्ष गोड बोलण्याचे आपण कबूल केले आहे.... जानेवारीच्या ४ तारखेच्या अभिनंदनाचे पत्र (त्यावेळी श्री. शंकररावांचा जन्मदिवस ४ जानेवारी अशी त्यांची व आमची समजूत होती) ६ तारखेला पंढरपूरला जाऊन परत मिळाले. पंढरीचा राणा माझे दैवत तेव्हा वाढदिवसाच्या अभिनंदनाचे व दीर्घायुष्य व यश चिंतणारे आपले पत्र पंढरीच्या विठोबाचे दर्शन घेऊन परत माझ्या हाती पडले. तेव्हा यंदाचे वर्ष चांगले जाणार यात संशय नाही; व या वर्षाच्या प्रारंभी ज्या घटना घडल्या आहेत त्या जर भावी घडामोडीच्या पूर्वचिन्ह असतील तर यंदाचे वर्ष चांगले जाणार असे गृहीत धरून चालण्यास हरकत नाही. 'लोकशक्ती'च्या आयुष्यात जी घटना मध्यंतरी घडली तिच्यामुळे माझी प्रतिष्ठा कमी होण्याऐवजी वाढली असेच मला वाटते इतकेच नव्हे तर एखादे गंडांतर टळले म्हणजे आयुष्य वाढते त्याप्रमाणे 'लोकशक्ती'चे होणार असे माझे मन मला सांगते. जेव्हा जेथे पहिली भेट होईल तेथे मला आठवण करा म्हणजे सर्व सविस्तर सांगेन."

याच १९४० सालात वैयक्तिक कायदेभंगाची चळवळ सुरू झाली. युरोपात युद्ध पेटले होते व या देशात थोर पुढारी व सामान्य कार्यकर्ते कारावासात जात होते. महात्मा गांधी बाहेर राहून चळवळीला मार्गदर्शन करीत होते व तिचे संचालन करीत होते. श्री शंकररावांनी कायदेभंग केला. त्यांना दीड वर्षाची शिक्षा झाली. मीही तुरुंगात होते. तुरुंगातसुद्धा आमचा पत्रव्यवहार चालू होता. महिन्यातून दोन पत्रे लिहावयास मिळत. एक पत्र एकमेकास लिहीत असू व दुसरे बाहेर पाठवीत असू. मला तीन महिन्यांचीच शिक्षा होई. शिक्षा संपून सुटका झाल्यावर मी लगेच पुन्हा कायदेभंग करून तुरुंगात जाई. असे चार वेळा झाले. शेवटी सारेच कैदी सुटले ! मी सुटल्यावर बाहेरच्या मुदतीत जे घडले त्याची सविस्तर माहिती श्री. शंकररावांना तुरुंगात पत्राने कळवित असे. पहिल्या तुरुंगवासांतून मुक्त झाल्यावर महात्माजींच्या परवानगीने मी सेवाग्रामात जाऊन त्यांना भेटून आले होते. श्री. शंकररावांचीही भेट घेतली.

महात्माजींनी मला आपली चंदनमण्यांची जपमाळ दिली होती, ती मुलाखतीत श्री. शंकररावांनी मजकडून घेतली. अर्थात ती माळ जपून ठेवण्याबाबत मला त्यांना पत्रातून सूचना द्यावी लागली. मला त्यांचे उत्तर ता. १७–३–४१ चे तुरुंगातून आले, ते मला तुरुंगातच मिळाले :

" माझेही मत आचार्यां ( भागवत )–सारखेच आहे. मनातील भावना मनातच दडपून ठेवाव्यात, त्या व्यक्त करू नयेत असा माझा स्वभाव परिस्थितीमुळे बनला आहे, एवढाच त्यांच्या व माझ्यामधील फरक ... माळ जपून ठेवली आहे. त्यागाने वस्तूची किंमत व उपयुक्तता वाढते. ती आपल्याजवळ राहिली असती तर तिने आपल्याला फक्त महात्माजींचे स्मरण करून दिले असते. परंतु ती माझ्याजवळ आल्यामुळे ती मला महात्माजींचे व त्याबरोबरच आपलेही नित्य स्मरण करून देते. 'तेन त्यक्तेन भुञ्जीथाः' किती सत्य आहे ! ... महात्माजींच्या सहवासात घालविलेल्या कालाबद्दल जे आपण लिहिले, ते आपल्या बाबतीत अक्षरशः खरे. त्या बाबतीत आपले भाग्य फार मोठे आहे. तसे फार थोड्यांच्या वाट्याला येते. म्हाताऱ्याने महान् जबाबदारी शिरावर घेतली आहे आणि ज्या काठ्यांच्या जोरावर तो गोवर्धन उचलणार त्या काठ्या मात्र बहुतेक पिचक्या आहेत एवढाच भेद ! भविष्याच्या उदरात काय झाकून ठेवले आहे ते ईश्वर जाणे ! आणि आपण मानवांनी त्या वरचा पडदा दूर करण्याचा प्रयत्न न करणेच बरे ! ... "

सन १९४२ च्या तीन वर्षांच्या कारावासातून मुक्त झाल्यावर राजकारण वेगात चालू झाले. श्री. शंकरराव घटनापरिषदेचे सदस्य झाले. ते काँग्रेसचे महामंत्री तर होतेच. पुढे नोआखालीत मुसलमानांनी हिंदूंवर अत्याचार केले व शांतिस्थापनेसाठी महात्मा गांधींची पदयात्रा त्या प्रदेशात सुरू झाली. तेव्हा एकदा महात्माजींशी विचारविनिमय करण्यासाठी खास विमानाने पंतप्रधान नेहरू, काँग्रेसचे अध्यक्ष आचार्य कृपलानी व श्री. शंकरराव हे नोआखालीस गेले होते. तेथून परत आल्यावर त्यांनी ता. ३.१.४७ रोजी पाठवलेल्या पत्रातील उतारा देत आहे :–

" नोआखालीचा जाता-येताचा प्रवास व तेथील दोन दिवसांचा मुक्काम माझ्या जीवनात एक नवीनच अनुभव होता. सर्व्हिसच्या विमानातून स्पेशल विमानात प्रवास करण्याचा अनुभवही घेतला. अखेर विमानाचा कंटाळा आला. हिंदुस्थानसरकारच्या उपाध्यक्षाबरोबर प्रवास असल्यामुळे प्रवासातली सर्व व्यवस्था उत्तम व थाटाची होती हे लिहिण्याची जरूरच नाही. पण अशा प्रसंगातून माझे मन थोडे 'यांत काही विशेष नाही' अशा भूमिकेवरूनच

सर्व गोष्टींकडे पहाते. परत प्रवासात कलकत्त्याला जो थोडा वेळ मिळाला त्यात बेलूरला गेलो होतो. बरोबर प्रफुल्लबाबू होते. सायंकाळची वेळ होती. परमहंसांच्या मंदिरात ती आरतीची व भजनाची वेळ होती. १५–२० मिनिटे भगव्या वस्त्रांच्या संन्याश्यांत संन्यासधर्मावर विश्वास असलेला पांढऱ्या वस्त्रांचा संन्यासी (!) सामील झाला होता. खूप बरे वाटले ! पंढरपूरला गेलो म्हणजे जसे विठ्ठलाचे मंदिर त्याप्रमाणे कलकत्त्याला गेलो म्हणजे बेलूरचा मठ ! भेट दिल्याशिवाय मी परत येत नाही. " . . .

श्री शंकररावांचे मन राजकारणात देखील परमार्थाचा संपर्क सतत टिकवीत असे. त्यांच्या पत्रांतून गीता, उपनिषदे, शाङ्करभाष्य यांतील उद्‌गार जागोजाग विखुरलेले आहेत. शेवटपर्यंत ते साधक राहिले. बालपणी त्यांच्या मनात स्फुरलेल्या दोन महत्त्वाकांक्षा :– (१) आपण काँग्रेसचे अध्यक्ष झाले पाहिजे (२) आपण ऋषिमुनींचे जीवन जगले पाहिजे व आत्मसाक्षात्कार करून घेतला पाहिजे. – त्या वर्तमान जीवनात अपूर्ण राहिल्या. दुसरी पुढील जन्मात पूर्ण व्हावी यास्तव ईश्वराने त्यांचेवर कृपा करावी ही प्रार्थना !

◆ ◆ ◆



अनुक्रमणिका





पुस्तक-परिचय –

# डॉ. भाऊ दाजी यांचे समग्र वाङ्मय *

डॉ. भाऊ दाजी लाड ( १८२४–१८७४ ) यांचे समग्र लेख व भाषणे ज्यांत समाविष्ट आहेत असा हा ग्रंथ डॉ. त्र्यं. गो. माईणकर यांनी संपादित केला असून, मुंबई विद्यापीठाने १९७४ साली डॉ. भाऊ दाजी यांच्या शत-सांवत्सरिक पुण्यतिथीनिमित्त तो प्रकाशित केला आहे. मुंबई विद्यापीठ १९५७ साली स्थापन झाले. ते स्थापन करण्यात डॉ. भाऊ दाजी यांचा वाटा अग्रगण्य होता. त्यामुळे ते साहजिकच मुंबई विद्यापीठाचे एक संस्थापक गणले गेले आहेत. ते मुंबई विद्यापीठाच्या आर्ट आणि मेडिसिन या फॅकल्टीचे शेवटपर्यंत सभासद होते. ते विद्यापीठाच्या सिंडिकेटवर निवडून आले. विद्यापीठाच्या सिंडिकेटचे ते पहिले हिंदी सभासद होत. १८५७ साली मुंबई विद्यापीठाच्या पहिल्या पदवीदानसमारंभाच्या वेळी त्या वेळचे कुलगुरु, न्या. मू. जेम्स गिल्स यांनी आपल्या दीक्षान्त भाषणांत नवीन पदवीधरांना ‘ डॉ. भाऊ दाजींच्या ज्ञान-मय व कृतिमय जीवनाचा आदर्श आपणांपुढे ठेवावा ’ असे कळकळीचे आवाहन केले होते. भाऊ दाजींच्या स्मरणार्थ मुंबई विद्यापीठांत बी. ए. मध्ये संस्कृत या विषयांत पहिल्या येणाऱ्या विद्यार्थ्यास ‘ भाऊ दाजी प्राइझ ’ हे १८७६ पासून देण्यात येत आहे. डॉ. भाऊ दाजींचा मुंबई विद्यापीठाशी आलेला व चालू राहिलेला घनिष्ठ संबंध लक्षात घेऊन कै. डॉ. अ. का. प्रियोळकरांनी मुंबई विद्यापीठाला डॉ. भाऊ दाजींचे समग्र वाङमय त्यांच्या शतसांवत्सरिक पुण्य-तिथीच्या निमित्ताने प्रसिद्ध करावे अशी सूचना केली होती. ती सूचना विद्या-

* Writings and Speeches of Dr. Bhau Daji Editor : T. G. Mainkar M. A. Ph. D, D. Litt, R. G. Bhandarkar Professor of Sanskrit, University of Bombay. Published by T. V. Chidambaram, Registrar University of Bombay, Bombay– 32 (1974), pp 1–420 ( Royal size ), Price Rs. 54.

अनुक्रमणिका

पीठाधिकाऱ्यांनी स्वीकारली. ती स्वीकारण्यांत मुंबई विद्यापीठाने व कुलगुरु प्रा. टी. के. टोपे यांनी जे औचित्य व आपल्या एका संस्थापकाविषयी यथार्थ आदर व्यक्त केला त्यांचेच प्रस्तुत ग्रंथ उज्ज्वल मूर्तिमंत फल होय.

प्रस्तुत ग्रंथाची संपादकांनी डॉ. भाऊ दाजींच्या जीवनावर प्रकाश टाकणारी अशी व्यवस्थित वर्गीकरणयुक्त चार प्रकरणे पाडली आहेत: १. भाऊ दाजींचा संक्षिप्त जीवनवृत्तान्त २. भाऊ दाजींचे प्राच्यविद्यासंशोधन, समाज–राजकारणविषयक विचार आणि वैद्यकीय संशोधन यावरील सुमारे २५ च्या वर लेख ३. मुंबईत त्यांनी ज्या संस्था स्थापन केल्या त्या संस्थांतून व त्यांच्या सांनिध्यात आलेल्या प्रमुख व्यक्तींसंबंधी केलेली भाषणे ४. भाऊ दाजींच्या निधनोत्तर प्रमुख वृत्तपत्रांतून व संस्थांच्या सभांतून व्यक्त झालेली त्यांच्या जीवनकार्याविषयी गुणगौरवपर मते– यांशिवाय भाऊ दाजींनी ज्या (लेण्यांतील) कोरीव लेखांतील लिपीचा व शब्दांचा अर्थ लावून आपले प्राच्यविद्याविषयक संशोधन मांडले अशा १० कोरीव लेखांचे मुद्रित ठसे स्वतंत्र पानांवरून जोडले आहेत. प्रत्येक प्रकरणाच्या आरंभी संपादकांनी त्या त्या प्रकरणांत येणाऱ्या विषयांचा वेध घेणारी, मर्मग्राही, विवेचक छोटी 'प्रास्ताविके' लिहिली आहेत.

१. 'भाऊ दाजींच्या संक्षिप्तजीवनवृत्तान्ता'च्या टिपणात संपादकांनी भाऊ दाजींच्या असामान्य अष्टपैलू प्रज्ञेचा, त्यांच्या समाजाभिमुख परोपकारी व्यक्तिमत्त्वाचा व असाधारण कर्तृत्वाचा उद्‌बोधक परिचय करून दिला आहे. भाऊ दाजी लाड हे जुन्या सावंतवाडी संस्थानांतील आपल्या आजोळी लांजे या गांवी १८२४ साली जन्मले. त्यांची कौटुंबिक परिस्थिति गरीबीचीच होती. त्यांचे वडील मातीच्या मूर्ती बनवीत असत. १८३३ साली ते आपल्या कुटुम्बियांना घेऊन मुंबईला आले. भाऊ दाजींचे मराठी व इंग्रजी शिक्षण मुंबईलाच झाले. १८४० साली ते इंग्रजी स्कूल लीव्हिंग परीक्षा पास झाले. शाळेतील बक्षिसे, शिष्यवृत्त्या, सुवर्णपदके त्यांनी मिळविली. ज्या एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूशनमधून ते पास झाले त्याच संस्थेमध्ये १८४३ साली त्यांची रसायन शास्त्र व इतर निसर्गशास्त्रे शिकविण्याकरिता शिक्षक म्हणून नेमणूक झाली. याच अवधीत म्हणजे १८४३ ते १८४५ या दोन वर्षांत त्यांनी संस्कृतचा खासगी रीतीने अभ्यास केला व आपल्या पुढील प्राच्यविद्यासंशोधनाची पूर्वतयारी केली. १८४४ साली त्यांनी 'बालकन्याहत्या' (Female Infanticide) या विषयावर इंग्रजीत व गुजरातीत निबंध लिहून ६०० रु. चे सरकारने ठेवलेले बक्षीस मिळविले. कच्छ व काठेवाड या गुजरातच्या भागात जाडेज नावाच्या रजपूत जमातीमध्ये मुलगी झाल्याबरोबर तिला मारून टाकायची

ही अमानुष चाल होती. धर्मात ढवळाढवळ होईल या क्षोभाच्या भीतीमुळे ही चाल कायद्याने बंद करणे शक्य नव्हते. म्हणून या चालीविरुद्ध चळवळ करण्याचे एक साधन म्हणून इंग्रज सरकारने 'अर्भकबालिकाहत्ये'वर निबंधांची स्पर्धा भरवून या चालीविरुद्ध लोकमत तयार करण्याच्या उपक्रमाचा अवलंब केला. भाऊदाजींनी लिहिलेल्या बक्षिस–पात्र निबंधाची सर्वत्र वाखाणणी झाली. हा संशोधनपूर्वक परिश्रम करून लिहिलेला उत्कृष्ट निबंध म्हणजे त्यांनी आपल्या असामान्य प्रज्ञेने जे पुढे संशोधनपूर्ण लिखाण केले त्याची मुहूर्तमेढच होय असे म्हणता येईल. याच सुमारास म्हणजे १ नोव्हेंबर १८४५ ला मुंबईचे ग्रँट मेडिकल कॉलेज निघाले. भाऊ दाजींच्या प्रज्ञेची झेप अशी की त्यांनी आपली शाळेतील शिक्षकाची नोकरी सोडून ग्रँट मेडिकलमध्ये शिक्षण घ्यावयाचे ठरविले. ग्रँट मेडिकल सुरू झाले त्याच दिवशी त्यांनी त्यांत आपले नांव दाखल केले व मेडिकल कॉलेजचा अभ्यास तेथील नाना बक्षिसे व शिष्यवृत्ती मिळवीत पुरा करून १५ एप्रिल १८५१ ला पदवीधर–डॉक्टर असे प्रमाणपत्र मिळविले. ग्रँट मेडिकल कॉलेजमधून बाहेर पडलेल्या या यशस्वी पदवीधराची सरकारने सरकारी इस्पितळांत ॲसिस्टंट सर्जनच्या जागेवर नेमणूक केली. पण डॉ. भाऊ दाजींनी तिचा राजीनामा देऊन स्वतंत्र डॉक्टरी व्यवसाय सुरू केला. येथे डॉ. भाऊ दाजी यांच्या त्यागी परोपकारी व्यक्तिमत्त्वावर प्रकाश पाडणाऱ्या घटनेचा उल्लेख केला पाहिजे. ग्रँट मेडिकल कॉलेजमध्ये शिक्षण घेत असताना भाऊ दाजी त्या कॉलेजच्या लायब्ररीत काम करीत व चरितार्थाकरिता लागणारा पैसा मिळवीत. मेडिकल कॉलेजच्या अखेरच्या परीक्षेत उज्ज्वल यश संपादन केल्यावर त्यांना अनेक बक्षिसे व शिष्यवृत्त्या मिळाल्या. पण त्यांनी त्या नाकारल्या व त्या आपल्या खालोखाल नंबर मिळविलेल्या पदवीधरास मिळाव्या अशी इच्छा व्यक्त केली ... हीच त्यांची परोपकारशील त्यागी वृत्ति त्यांच्या डॉक्टरी व्यवसायात दिसून आली. आपल्या असामान्य प्रज्ञेमुळे ते उत्तम डॉक्टर व सर्जन म्हणून त्यांचा लौकिक झाला. गरीबांचे मोठे कैवारी डॉक्टर म्हणून त्यांची विशेष प्रसिद्धि झाली. त्यांनी १८५३ मध्ये एक धर्मार्थ दवाखाना काढला, तो १८६७ पर्यंत – त्यांच्यावर आर्थिक अरिष्ट येईपर्यंत चालू होता. दवाखाना चालू असताना त्यांनी यशस्वी शस्त्रक्रिया करून मूत्राशयातील 'खडे' काढले ते त्यांनी अवशेष म्हणून बाटल्यांत जपून ठेवले होते. दवाखाना बंद झाल्यावर, त्या बाटल्यांतील खड्यांना हिरेमाणकांची सर आहे असे ते सार्थ अभिमानाने सांगत असत. भाऊ दाजींच्या प्रज्ञेचा संशोधकीय आविष्कार त्यांच्या डॉक्टरी व्यवसायात दिसून आला. आयुर्वेदात सांगितलेल्या औषधी वनस्पतींपासून

बनविलेल्या औषधांचा ते आपल्या रुग्णांवर प्रयोग करून पहात असत. असे प्रयोग करीत असताना, महारोगावर (रक्तपितीवर) एक अत्यंत गुणकारी असे औषध त्यांना सापडले. त्या औषधामुळे त्यांनी कित्येक रुग्ण बरे केले. त्या औषधाचे नांव डॉ. भाऊ दाजींनी, ते प्रयोगावस्थेत असल्यामुळे, जाहीर केले नाही. गोव्याकडील मुलुखांत वाढणारी 'खष्ट' किंवा कवटी नावाच्या झाडाच्या फळातील बियांपासून तेल तयार करून त्याचा उपचार ते महारोगांवर करीत असावेत असे त्यांच्या कांही पत्रावरून म्हणता येते. डॉ. भाऊ दाजींना जर दीर्घायुष्य लाभले असते, तर प्रयोगावस्था संपून हे औषध हमखास खात्रीलायक गुणकारी आहे असे निरपवाद सिद्ध झाल्यावर त्यांनी त्यांच्या परोपकारशील वृत्तीमुळे ते जाहीर केले असते ! डॉक्टरीच्या व्यवसायांतून फावलेल्या वेळांत डॉ. भाऊ दाजींनी प्राच्यविद्यासंशोधन आरंभले. त्यांनी संस्कृतचा अभ्यास १८४३ पासून सुरू केला होता त्याचा उल्लेख मागे आलाच आहे. तो चालू ठेवून त्यांनी प्राचीन हस्तलिखिते, शिलालेख यांच्या संशोधनास हात घातला. स्वतः ते वेरूळ, अजंठा घारापुरी या ठिकाणी गेले व तेथील शिलालेखांच्या प्रती व ठसे आणून त्यांच्या संशोधनास सुरवात केली. डॉक्टरी व्यवसायामुळे त्यांना, वारंवार बाहेर जाऊन ठिकठिकाणचे शिलालेख पहाणे शक्य नव्हते. परंतु त्याना या कामी पं. भगवानलाल इंद्रजी या हुशार, संशोधकाची खूप मदत झाली. इंद्रजीला स्वतःच्या खर्चाने वेरूळ, जेसलमीर, मथुरा, आग्रा, जुनागड व नेपाळमधील स्थळे या ठिकाणी ते वारंवार पाठवीत व त्यांच्याकडून हस्तलिखिते जमा करवीत, हस्तलिखितांच्या व कोरीव लेखाच्या नकला जमवून हे सर्व साहित्य आणावयास सांगत. ते आणल्यावर त्यांचा अभ्यास करून त्यांनी त्यासंबंधी आपले लेख मुंबईच्या रॉयल एशिआटिक सोसायटीच्या नियतकालिकांतून प्रसिद्ध केले आहेत. या त्यांच्या मौलिक संशोधकीय लेखनामुळे त्यांना आंतरराष्ट्रीय कीर्ति मिळाली. मुंबईच्या रॉयल एशिआटिक सोसायटीचे, त्या सोसायटीच्या कार्यकारी मंडळाचे ते सदस्य निवडले गेले व पुढे १८६४ सालापासून ते अखेरपर्यंत उपाध्यक्षपदी होते ते लंडन, पॅरिस येथील रॉयल एशिआटिक सोसायटीचे, जर्मन ओरिएंटल सोसायटीचे, अमेरिकन ओरिएंटल सोसायटीचे सन्माननीय सदस्य निवडले गेले. डॉ. भाऊ दाजींची शिक्षणक्षेत्रांतील कामगिरी उल्लेखनीय आहे. सरकारच्या 'बोर्ड ऑफ एज्युकेशन' वर त्यांची निवड झाली. मुंबईत 'स्टूडंट्स लिटररी अ‍ॅन्ड सायन्टिफिक सोसायटी' या नावाची संस्था १८४८ साली स्थापिली गेली. डॉ भाऊ दाजी या संस्थेचे प्रमुख सदस्य होते. ही संस्था ३ मराठी शाळा व ४ गुजराथी शाळा चालवीत असे. त्यातील एक मुलींची शाळा होती. तिला

आर्थिक स्थैर्य प्राप्त होईपर्यंत डॉक्टर भाऊ दाजींनी महिना ४० रुपये द्यावयाचे ठरविले. भाऊ दाजींची स्त्री–शिक्षणाविषयींची आस्था बघून त्यांच्या कांही युरोपिअन, पार्शी, गुजराथी मित्रमंडळींनी १६००० रु. जमवून या मुलींच्या शाळेच्या निधीला दिले. मुलींच्या ह्या शाळेस ' डॉ भाऊ दाजी गर्ल्स स्कूल ' असे नांव दिले गेले. या सर्व गोष्टींवरून या इतक्या जुन्या काळी डॉ. भाऊ दाजींची स्त्रीशिक्षणाविषयी किती उत्कट तळमळ होती व तिला त्यावेळच्या निवडक समाजाने कशी साद दिली ते व्यक्त होते. – डॉ. भाऊ दाजी राजकारणातही रस घेत असत. १८५२ मध्ये ' बाम्बे असोशिएशन ' नांवाची संस्था स्थापन झाली. तिचा उद्देश हा होता की, ग्रेट ब्रिटनमधील सरकारकडे एक जाहीर निवेदन सादर करावे व त्या निवेदनात भारतीयांच्या– कल्याणकारी सुराज्य याविषयीच्या– आकांक्षा, गरजा मांडून ब्रिटिश लोकमत जागृत करावे, व त्या योगाने हिंदुस्थानविषयक कायदेकानूंत व राज्यकारभारात इष्ट तो फेरबदल घडवून आणावा. हे निवेदन तयार करण्याकरता सर जेमशेटजी जिजीभाई हे अध्यक्ष व डॉ. भाऊ दाजी व विनायकराव शंकरशेट हे सेक्रेटरी यांची एक कमिटी नेमली. या कमिटीत पुढाकार मुख्यत्वे भाऊ दाजींचाच होता. निवेदनाचा मसुदा तयार करण्यापूर्वी भाऊ दाजींनी एक संबद्ध प्रश्नावलि तयार करून तिची उत्तरे देण्यास तिच्या प्रती प्रमुख पुढारी, विचारवंत व निरनिराळ्या संस्था यांच्याकडे पाठविल्या. त्या उत्तरांच्या आधारे भाऊ दाजींनी कमिटीच्या संमतीने एक निवेदन तयार करून ते इंग्लंडमधील हाऊस ऑफ लॉर्ड्स व हाऊस ऑफ कॉमन्स या सभांकडे १८५३ च्या मार्च–जुलै मध्ये सादर केले. ' सद्य:परिस्थितीत आम्हाला तुमचे म्हणणे मान्य करिता येत नाही ' असे ब्रिटिश पार्लमेंटने या निवेदनाला उत्तर दिले. पण त्या वेळच्या वृत्तपत्रांतून त्या निवेदनातील सदभिरुचि, संयम, समंजसपणा इत्यादि गुणांची वाखाणणी करण्यात आली. पुढे १८६३ सालच्या नोव्हेंबरमध्ये बाँबे असोशिएशनचा डॉ. भाऊ दाजींनी राजीनामा दिला. त्यानंतर बाँबे असोशिएशन नाममात्र राहिली, तिच्यातून जणू प्राण निघून गेला असे वृत्तपत्रांतून नमूद केलेले दिसून येते. डॉ. भाऊ दाजी असतानाची बाँबे असोशिएशन पुढे १८८५ साली स्थापन झालेल्या इंडिअन नॅशनल काँग्रेसची एक प्रकारे नांदीच होय. – डॉ. भाऊ दाजींना ग्रंथांचे मोठे वेड होते व त्यांचे स्वत:चे ग्रंथालय समृद्ध होते. हीच ग्रंथांची आवड समाजात निर्माण व्हावी म्हणून भाऊ दाजींनी अखंड प्रयत्न केले. नेटिव्ह जनरल लायब्ररी, पुढे नावारूपास आलेल्या डेव्हिड ससून लायब्ररी व पेटिट लायब्ररी या ग्रंथालयांना आरंभीच्या अवस्थेत प्रोत्साहन भाऊ दाजींकडून मिळाले. – डॉ.

भाऊ दाजी यांना वैद्यकीय दृष्टचा वृक्षवनस्पतींची भारी आवड होती. त्यांच्या घरच्या पाठीमागच्या अंगणात अशा वृक्षवनस्पतींची रेलचेल असे. त्याच प्रेरणेने मुंबईमध्ये त्यांनी व्हिक्टोरिया गार्डन व म्युझिअम यांची स्थापना करण्यात पुढाकार घेतला – डॉ. भाऊ दाजींच्या अष्टपैलु व्यक्तिमत्त्वाचा आणखी एक आविष्कार म्हणजे त्यांनी नाटके, नाटकमंडळी यांना दिलेले सक्रिय प्रोत्साहन होय. ज्या काळात नाटक्यांना, नटांना समाजाकडून कमी लेखले जात असे त्या काळात महाराष्ट्रांतील आद्य नाटककार सांगलीचे विष्णुदास भावे यांच्या नाटककंपनीला सर्वतोपरी मदत करण्यात, त्यांच्या नाटकाची तिकिटे खपविण्यात भाऊंचा पुढाकार होता. गव्हर्नरच्या बंगल्यात राजा गोपीचंद या हिंदी नाटकाचा प्रयोग घडवून आणण्यातही त्यांचा मोठा वाटा होता. – डॉ. भाऊ दाजी हे कट्टे समाजसुधारक होते. दुर्दैवाची कुऱ्हाड पडलेल्या बालविधवांचे विवाह व्हावेत असे त्यांना उत्कटतेने वाटे. १८६६ साली स्थापन झालेल्या पुर्नविवाहोत्तेजक सभेचे ते सदस्य असून जेथे जेथे विधवांचे पुर्नविवाह होत तेथे अगत्यपूर्वक हजर रहात. त्याबद्दल किंवा परदेशगमनाबद्दल प्रायश्चित्त घेणे त्यांना मान्य नव्हते एक वल्लभपंथी भोंदू, व्यसनी धर्मगुरु यांच्याविरुद्ध त्यांनी जी कोर्टात निर्भयपणाने साक्ष दिली ती त्यांच्या श्रेष्ठ सामाजिक नीतिमत्तेची निदर्शक आहे. अन्यायाची त्यांना भयंकर चीड होती. विठोबा मल्हार नावाचा एक गरीब शिंपी; याला अन्यायाने कैदेची शिक्षा झाली होती. तीविरुद्ध डॉ. भाऊ दाजी यांनी कोर्टात दाद मागून, शेवटपर्यंत त्या शिंप्याचा खटला लढविला व त्या शिंप्याची निर्दोष सुटका करून त्याला न्याय मिळवून दिला. – धार्मिक श्रद्धेच्या दृष्टीने डॉ. भाऊ दाजी 'सर्वधर्मसमभावी' होते. स्वतः हिंदु म्हणून ते हिंदु आचार-विचार पाळीत असले तरी ख्रिस्त धर्म, प्रार्थनासमाज, परमहंससभा यांतील शुद्ध पवित्र आचारविचारांची व परोपकारान्तर्गत जनसेवेची शिकवण याबद्दल त्यांना परम आदर होता. – आपल्या देशात उद्योगधंदे वाढून आपल्या देशवासियांची भरभराट व्हावी या प्रेरणेने त्यांनी 'बाँबे पेपर मॅन्युफॅक्चरिंग कंपनी' १८५४ साली स्थापन करण्यात पुढाकार घेतला व त्या कंपनीच्या कार्यकारी मंडळाचेही ते सदस्य होते. कापडाच्या गिरण्या काढण्यासही त्यांनी सक्रिय प्रोत्साहन दिले :– डॉ. भाऊ दाजी यांचा डॉक्टरी व्यवसाय ( १८५१–१८६४ ) अत्यंत यशस्वी व भरभराटीत होता व त्यांची आर्थिक स्थिती चांगली होती. परंतु १८६५ च्या सुमारास ते एका मोठ्या आर्थिक अरिष्टात सांपडले. १८६१ ते १८६५ या काळात अमेरिकेत जे गुलामगिरीच्या प्रश्नावरून यादवी युद्ध झाले. त्याचा परिणाम इंग्लंडमधील कापडगिरण्यांवर झाला. इंग्लंडमधील कापड-

गिरण्यांना कापूस पुरवावा म्हणून मुंबईला बॅकबे रिक्लमेशन कंपनी निघाली. त्याचे शेअर खपविण्याच्या व घेण्याच्या वावटळीच्या भोंवऱ्यात डॉ. भाऊ दाजी सापडले व त्यात त्यांचे पैसे बुडून त्यांना आर्थिक ओढगस्तीची स्थिती आली. तरी पण ते डगमगले नाहीत. त्यांचा वैद्यकीय व्यवसाय व महारोग्यांवरील उपचार, प्राच्यविद्यासंशोधनाचे काम चालूच होते. पण १८७३ च्या मेमध्ये ते एकदम पक्षघाताने आजारी पडले व ३१ मे १८७४ रोजी निधन पावले. त्यांच्या जीवनाची जी संक्षिप्त रूपरेषा वर दिली आहे, तीवरून डॉ. भाऊ दाजी लाड हे असामान्य प्रज्ञा, अष्टपैलू व्यक्तिमत्त्व, सामाजिक परोपकारी जागरूकता अंगी असलेले असामान्य पुरुष असून त्यांच्या काळात भारतात, विशेषतः मुंबईत ( – महाराष्ट्रात ) ज्या सर्वांगीण सामाजिक प्रबोधनास सुरुवात झाली त्याचे ते एक प्रभावी व प्रमुख प्रवर्तक होत असे लक्षात येईल.

२. या ग्रंथाच्या दुसऱ्या प्रकरणात ( पृ. २२–२५४ ) डॉ. भाऊ दाजींचे विविध ज्ञानक्षेत्रातील लेख पुनर्मुद्रित केले आहेत : ( i ) प्राच्य-विद्या-संशोधन-संबद्ध असे 'कालिदास,' 'रुद्रदाम यांचे जुनागड येथील शिलालेख.' 'प्राचीन संस्कृत शिलालेखांतील आकड्या ( numerals ) चा उलगडा,' हेमाद्रि, हेमचंद्र, माधव व सायन, मुकुंदराज यावरील टिपणे, 'कुमारगुप्तकालीन काही नाण्यांवरील मजकुराचा खुलासा', 'मेरुतुंगाची थेरावली' इत्यादि लेख आहेत. या वीस लेखांपैकी १९ लेख मुंबईच्या रॉयल एशिआटिक सोसायटीच्या नियतकालिकात छापले गेले आहेत. यांशिवाय एक लेख 'आर्यभट, वराहमिहिर व भट्टोत्पल यांच्या ग्रंथांचा काळ इ०' हा लंडन येथील रॉयल एशिआटिक सोसायटीच्या नियतकालिकाच्या १८६५ च्या अंकात प्रसिद्ध झाला आहे. संपादक डॉ. माईणकर यांनी म्हटल्याप्रमाणे, ताम्रपट, शिलालेख व नाणी यांच्या 'वाचना'त व कालसंबद्ध अर्थ लावण्यात अलीकडील कै. डॉ. अळतेकर व डॉ. म. म. मिराशी यांनी कांही दुरुस्त्या करून मोलाची भर घातली आहे. उदाहरणार्थ, अजंठा येथील १६ व्या लेण्यांतील शिलालेखांचा अर्थ, वाकाटक हे ग्रीक होते असा भाऊ दाजी यांनी लावला होता. परंतु वाकाटक हे ग्रीक नसून ब्राह्मण राजे होते हे आता सिद्ध झाले आहे. तरी पण डॉ. भाऊ दाजींचे या विषयावरील लेख आद्य, संशोधनप्रवर्तक असल्यामुळे त्यांचे मोल इतिहासात कायमचे राहील. विशेषतः प्राचीन संस्कृत लिपी व तीमधील लेखांचा अर्थ लावण्यात ज्याने आद्य श्रेष्ठता संपादन केली असा प्रतिभावान् प्राच्य-विद्यासंशोधक जेम्स प्रिन्सेप यालाहि शिलालेखांतील ज्या संस्कृत संख्यावाचक

खुणांचा अर्थ लागला नाही, त्यांचा अर्थ डॉ. भाऊ दाजींनी आपल्या सूक्ष्म प्रज्ञेने व प्रतिभेने लावून दाखविला व त्या शिलालेखांतील व्यक्तींचा काल निश्चित केला, ही त्यांची श्रेष्ठ कामगिरी अविस्मरणीय होय. ( ii ) सामाजिक व राजकीय विषयावर केलेल्या लेखाचा या विभागात अन्तर्भाव केला आहे त्यांत पूर्वी उल्लेखिलेले ( १ ) 'बालकन्याहत्या' यांवरील इंग्रजी (अपूर्ण उपलब्ध ) व गुजराती ( संपूर्ण उपलब्ध ) निबंध (२) ब्रिटिशपार्लमेंटला केलेली निवेदने (petitons) ही आहेत. (iii) या विभागात, ग्रँट मेडिकल कॉलेज सोसायटी ( १८५१ ) या संस्थेच्या वेळोवेळी भरलेल्या बैठकीसमोर डॉ. भाऊ दाजींनी आपल्या अनुभवाच्या आधारे वैद्यकशास्त्रातील विषयांवर ( उदाहरणार्थ, सापाच्या विषावर इलाज ठरणाऱ्या काही औषधी व उपचार, काही एतद्देशीय औषधी वनस्पती, मूत्राशयांतील खडे काढण्याच्या शस्त्रक्रिया (lithotomy) यांवर ) लिहिलेल्या लेखांचे केवळ संक्षिप्त सारांश आहेत मूळ संपूर्ण लेख उपलब्ध झाले नाहीत.

३. तिसऱ्या प्रकरणात संपादकांनी डॉ. भाऊ दाजी यांनी निरनिराळ्या प्रसंगी केलेली भाषणे दिली आहेत. भाऊ दाजी मोठे प्रभावशाली वक्ते होते. अभ्यासपूर्ण पण स्वतंत्र विचारांची अशी त्यांची अत्यंत मुद्देसूद भाषणे चांगल्या इंग्रजीचे नमुने होत. बाँबे असोशिएशनतर्फे झालेली भाषणे, व्हिक्टोरिआ गार्डन व म्युझिअम यांचा उपक्रम, शिक्षणप्रसार यांवरील भाषणे, न्यायाधीश सर एर्स्किन पेरी, गव्हर्नर सर बार्टल फ्रिअर, एक अष्टपैलू विद्वान ख्रिस्तधर्मगुरू डॉ. विल्सन इत्यादि श्रेष्ठ व्यक्तींवर केलेली गुणग्रहणपर भाषणे यांचा या प्रकरणात समावेश आहे. व्हिक्टोरिआ गार्डनच्या निमित्ताने केलेल्या एका भाषणांत त्यांनी उद्धृत केलेल्या खालील इंग्रजी कवितेच्या पंक्ती उल्लेखनीय आहेत :

"Ever reaping somethlng newz: That which we have done, but earnest of the things which we shall do."

४. चौथ्या प्रकरणात ( पृ. ३९१–४११ ) डॉ. भाऊ दाजींच्या निधनोत्तर प्रमुख वृत्तपत्रांतून त्यांच्या कार्याचे व व्यक्तिमत्त्वाचे गुणग्रहण व मूल्यमापन करणारे लेख आले, त्याचा संग्रह संपादकांनी केला आहे. त्यावरून डॉ. भाऊ दाजींना समाजाच्या सर्व थरात किती मान होता, त्यांचे कार्य किती मोठ्या प्रमाणावर मान्यता पावले होते, त्यांचे व्यक्तिमत्त्व कसे विलोभनीय होते, याची उत्तम कल्पना येते.

शेवटी डॉ. भाऊ दाजींच्यावर लिहिल्या गेलेल्या ग्रंथांची संक्षिप्त सूचि व या ग्रंथात आलेल्या विषयांची सूचि दिली आहे. शेवटी दीड पानाचे शुद्धिपत्र दिले आहे. त्यांत सर्व अशुद्धे आली नाहीत. विद्यापीठातर्फे प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथात इतकी अशुद्धे रहावीत ही गोष्ट खटकल्याशिवाय रहात नाही.

डॉ. भाऊ दाजींच्या समग्र वाङ्मयाचा हा ग्रंथ प्रकाशित करून मुंबई विद्यापीठाने इतिहासकारांना एक मूल्यवान् साधनसंग्रहरूप ग्रंथ उपलब्ध करून दिला आहे. त्याबद्दल मुंबई विद्यापीठाच्या अधिकाऱ्यांना व संपादक डॉ. माईणकर यांना मन:पूर्वक धन्यवाद.

— वि. म. बेडेकर







# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

## मराठी

| | | |
|---|---|---|
| (१) | वैदिक संस्कृतीचा विकास ( तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ) | ३०·०० |
| (२) | भावार्थ रामायण ( श्री एकनाथ महाराज कृत ) बालकांड | १२·०० |
| (३) | इतिहासाचे तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) ... | १०·०० |
| (४) | क्रोचेचे सौंदर्यशास्त्र ( अनु. डॉ. रा. भा. पाटणकर ) ... | १०·०० |
| (५) | सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती ( प्र. रा. देशमुख ) | १०·०० |
| (६) | पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास ( डॉ. सुमंत मुरंजन ) ... ... ... | ८·०० |
| (७) | चार्वाक-इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | ६·०० |
| (८) | मानवाचा आदर्श ... ... ... ... | ६·०० |
| (९) | नवमानवतावाद ... ... ... ... | ५·०० |
| (१०) | गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) ... ... | ५·०० |
| (११) | लोकशाहीचे धोके ( श्री. पन्नालाल सुराणा ) ... ... | ४·०० |
| (१२) | भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श ( सौ. कमल पाध्ये ) ... | ४·०० |
| (१३) | हिंदी साहित्यविचार ( प्रा. पॅरेलाल गोहेल ) ... .... | ३·०० |
| (१४) | महाराष्ट्रातील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना ( श्री. चा. अ. दाभोलकर ) .... ... | २·०० |
| (१५) | वायुस्तुति ( माध्व ) समश्लोकी व तात्पर्यार्थासहित ... | १·०० |
| (१६) | न्यायसार - आचार्य भासर्वज्ञप्रणीत मराठी भाषांतर व अर्थबोधक टीपांसहित .... ... | ५·०० |
| (१७) | श्री. यशवंतराव चव्हाण- अभिनंदनग्रंथ ... ... | २०·०० |

मिळण्याचे ठिकाण- प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई ( जि. सातारा )






अनुक्रमणिका

